# भावदीपिका

( श्रीशांडिल्यभक्तिसूत्रांसहित )

श्रीदासगणूविरचित

ग्रंथरत्न.

सन १९४०

# अर्पणपत्रिका

॥ श्लोक ॥ ( शिखरिणी )

रमन् तत्त्वज्ञाने जनहितरतो दाननिपुणः ।
प्रतापोऽयं श्रेष्ठी धवलतरकीर्तिर्वितरति ॥
धनं तत्त्वज्ञानं क्षितिसकलभागे प्रकिरतुं ।
भवत्येवंप्रायो बहुजनहितायोत्तमधनं ॥ १ ॥
तरोर्बीजं क्षेत्रेऽप्रकटमपि चागच्छाति बहि- ।
र्भुवो धारापातैर्मुदिरसलिलानामिदमिव ॥
प्रसिद्धं वै सूत्रं मनुजवरशाण्डिल्यरचितं ।
प्रतापाम्भोदानां द्रविणजलपातैः खलु भुवां॥२॥

अनन्त.

# प्रस्तावना



त्रिसत्यस्य भक्तिरेव गरीयसी
भक्तिरेव गरीयसी
भक्तिरेव गरीयसी ।
( श्रीनारदभक्तिसूत्रें. )



ईश्वर आणि ईश्वरांश असे जे त्याचे भक्त यांची आज्ञा पाळणें हा, भक्तांची कृपा संपादूं पाहाणाऱ्याचा एक मुख्य धर्म होय. या न्यायानें, महाराष्ट्रांत सुविख्यात असलेले श्रीसंतकवि दासगणू महाराज यांनीं श्रीशांडिल्यभक्तिसूत्रांवरील या आपल्या **भावदीपिका**-नामक टीकाग्रंथास मी प्रस्तावना लिहावी अशी मला आज्ञा केल्यावरून, येथें चार शब्द लिहिण्याचें मी साहस करीत आहें.

साहस असें म्हणण्याचें कारण हें कीं, अशा प्रकारचे गहन ग्रंथ त्यांतील त्रिकालाबाधित सत्यामुळें सूर्याप्रमाणें स्वयंप्रकाशी आणि ध्रुवाप्रमाणें अढळ असतात; म्हणून एक तर, त्यांना प्रस्तावना, पुरस्कार, निवेदना इत्यादि बाह्य परिवेषाची अपेक्षाच राहात नाहीं; आणि शिवाय तसा एकादा उपचार समर्पण करण्यास जो मोटा अधिकार अंगीं असावा लागतो, तोहि माझ्या ठिकाणीं नाहीं. तरीपण, आज्ञा म्हणून, आणि नवयुगीन राहाटीप्रमाणें ग्रंथाला अशी एकादी अल्प उणीव राहूं नये एवढ्याचकरितां, हा माझा उपक्रम होय.

मुद्रणकलेची आधुनिक कालांतील सर्वांगीण प्रगति आणि सौकर्य यांमुळें आपणांपुढें प्रत्यहीं मुद्रित वाङ्मयाच्या राशी पडत आहेत. पण आपल्या जीविताला योग्य दिशेनें निश्चित स्वरूपाचें वळण लावून तें आनंदमय करील, असें वाङ्मय त्यांत फारच थोडें. बहुतेक वाङ्मय आपणांस क्षणभर मोहून रंजवील अशाच स्वरूपाचें असतें. वाचनालयांतून बाहेर पडणाऱ्या वाचकांस विचारून पाहा—तूं आज काय वाचलेंस म्हणून! आपणांकडे येणारीं वर्तमानपत्रें व इतर छोटीं

मोठीं पुस्तकें यांपैकीं आपण कोणकोणतीं पुस्तकें आणि तीं पुन्हा पुन्हां कितीदां वाचतों, हें लक्षांत आणा. आपल्या अहंममतेच्या संसाराचें क्षेत्र उत्तरोत्तर विस्तृत होत असल्यामुळें ( सध्यां तर त्यानें उत्तरेकडे फिनलँड गांठलें आहे ) हें वाङ्मय नजरेखालून नेण्याचा मोह आपणांस आवरतां येत नाहीं. पण असलें वाङ्मय क्षणिक सुखाचा आभास उत्पन्न करून एकाद्या विरल स्वप्नाप्रमाणें लगेंच मागें सरतें आणि मग तेथें दुसरें स्वप्न येतें. यासंबंधीं **पं. सातवळेकर** यांच्या 'जीवनप्रकाशांतील' प्रचंड शक्ति हें प्रकरण अवश्य पाहा.

श्री. चिपळूणकर, टिळक, गोखले, रानडे प्रभृति महापुरुषांनीं आपल्या अगाध विद्वत्तेनें, निःसीम स्वदेशप्रेमानें व अद्‌भुत कर्तृत्वानें उपयुक्त व लोकोपकारक असें उदंड वाङ्मय निर्माण केलेलें आहे, ही गोष्ट सत्य आहे. तरी पण त्यांच्या ग्रंथांचें महत्त्व कालवर्तमान परिस्थितिसापेक्ष असल्यामुळें, त्यांच्या ग्रंथांचें सुद्धां नित्य नेमानें कोणी पारायण करीत नाहीं!! फार तर दोनतीनदां वाचून असले ग्रंथ कपाटांत साभिमानानें संग्रहीत करण्यांत आपण भूषण मानतों.

पण श्रीभगवद्गीता, श्रीमद्भागवत, रामायण अशा प्रकारच्या ग्रंथांत धर्म, वेदांत तत्त्वज्ञान, इत्यादि मानवी जीविताच्या जिव्हाळ्याच्या अनेक प्रश्नांचें विवेचन असल्यामुळें या वर्गांत मोडणारे ग्रंथ आज हजारों वर्षांपासून या भरतभूवर मनुष्यांच्या मनोभूमींत दृढमूल होऊन राहिलेले असून अशा एका तरी ग्रंथाचें नित्यनेमानें पठण केल्याशिवाय पुष्कळ माणसें आपल्या आयुष्यांतील एकही दिवस अस्तास जाऊंच देत नाहींत. अन्नपाण्याशिवाय जसें त्यांना जगतां येत नाहीं, त्याचप्रमाणें नित्यपाठ केल्याशिवाय त्यांच्या अंतःकरणांत समाधान वाटतच नाहीं. हे ग्रंथ दिक्कालाद्यनवच्छिन्न म्हणजे परिस्थितिनिरपेक्ष होत. हे ग्रंथ चिरंजीव असून कोणत्याही जातीच्या अगर पंथाच्या मनुष्याला श्रेयस्कर व प्रेयस्कर व्हावे असेच आहेत. श्रीपार्वतीनें एकदां शंकरांना विचारिलें, " जेव्हां पाहावें तेव्हां आपण श्रीगीतेचा पाठ करण्यांत अगदीं निमग्न असलेले दिसतां, एवढें आहे तरी काय त्या गीतेंत ? " यावर श्रीशंकरांनीं जें उत्तर दिलें तें फार मार्मिक व अर्थभरित आहे:—

**तेथ हर म्हणे नेणिजे । देवी जैसें कां स्वरूप तुझें ।**
**तैसें हें नित्य नूतन देखिजे । गीतातत्त्व ॥**

श्रीशंकर म्हणाले, गीतेचें पुन्हां पुन्हां पठण करावें असें कां वाटतें, तें मलाही सांगतां येत नाहीं-नेणिजे.पण तुझ्या स्वरूपसौंदर्याप्रमाणें गीता-तत्त्व हें नित्य, नूतन व मनोहर आहे, यांत शंका नाहीं.

नेहेमीं हिरवेगार असणाऱ्या ( 'वृक्षेभ्यो हरिकेशेभ्यो नमः' ) Evergreen वृक्षांप्रमाणें या सनातन ग्रंथांचें आणखी एक वैशिष्टय आहे तेंही लक्षांत घेतलें पाहिजे. श्रीज्ञानेश्वरमहाराजांनीं म्हटलें आहे:—

**वाचे बरवें कवित्व । कवित्वीं रसिकत्व ।**
**रसिकत्वीं परतत्त्व । स्पर्श जैसा ॥**

गद्यात्मक ग्रंथांपेक्षां ज्यांतील वाक्यप्रबंध गेय म्हणजे मनांतल्या मनांत गुणगुणतां येतील अथवा गातां येतील ते अधिक आकर्षक वाटतात. शिवाय गेय ग्रंथ मुखोद्गत करण्यासही सुलभ; आणि त्यांतही जर दृष्टान्तादि काव्यालंकारांमुळें विविध मधुर रसांनीं ते थबकत असतील तर, ते अधिकच सुरस वाटतात. पण ह्याशिवाय जर त्यांतून शांतरसाच्या सुगंध व शीतल लहरी वाहात असल्यामुळें **परतत्त्व** स्पर्श म्हणजे परमात्म्याशीं समरस होण्याचा अनुभव त्यांच्या योगानें थोडासा जरी जाणवत असला, तर त्या आनंदाला तोडच रहात नाहीं. हे तिन्ही गुण कमीअधिक मानानें आपल्या या सर्वच सनातन प्राकृत संस्कृत ग्रंथांत एकवटलेले असल्यामुळें, ते ग्रंथ आपणांस नेहमींच इतके आवडतात.

पण यासंबंधीं आणखी एक महत्त्वाची गोष्ट तर अजून सांगावयाची ठेविली आहे. ती कोणती ?

ब्रह्मसूत्रें, उपनिषदें, भारत, भागवत, रामायण इत्यादि सर्वच सनातन ग्रंथांचा आस्वाद घेत घेत आजपर्यंत हजारों मुनिऋषी आनंद लुटीत लुटीत आपणांस धन्य मानीत आले आहेत. तरी पण तर्क, न्याय इत्यादि बुद्धिगम्य तात्त्विक चर्चेच्या ग्रंथांपेक्षां भारतभागवतादि भक्तिप्रधान ग्रंथांनीं भारतीय मनुष्यांच्या चित्तांची अधिक बळकट पकड घेतलेली आहे. आणि असें होणें हें अगदीं स्वाभाविक आहे. कारण भक्ति ही मनुष्याचें ईश्वराशीं तादात्म्य करून देणारी एक अवस्था असल्यामुळें, भक्तिप्रधान ग्रंथांमुळें प्राप्त होणारा आनंद हा माहेरीं जाणाऱ्या मुलीच्या आनंदासारखा एक विलक्षण अनुभव आहे. ब्रह्मवाद,

मायावाद, द्वैतवाद इत्यादिकात व्यग्र होणारा मनुष्य आपणां स्वतःस कोणी तरी दूरस्थ अथवा परका समजत असतो. पण भक्तियोगाच्या निरूपणांत वाचक अथवा श्रोता आपण स्वतः यांत कोठें तरी आहों, अशा भूमिकेवर आरूढ होऊन ईश्वराशीं आत्मभावनेनें अगर सेव्यसेवक भावानें अंशतः तरी सामरस्याचें सुख अनुभवीत असतो.

सर्व प्रकारचीं जाणतीं नेणतीं माणसें भक्तियोगाकडे स्वभावतःच अधिक आकृष्ट होण्याचें आणखी एक कारण असें कीं, कर्ममार्ग, ज्ञानमार्ग, योगमार्ग इत्यादि मार्गांपेक्षा भक्तिमार्ग देखादेखी कां होईना, पण तो अधिक सुलभसा वाटतो. भक्तिमार्गांत विशिष्ट क्रियाकर्मांचें अथवा साधनसामग्रीचें मुळीं प्रयोजनच नसतें. भक्तिमार्ग हा क्रियानिरपेक्ष व परिस्थितिनिरपेक्ष आहे. कोणत्याही स्थळीं व कोणत्याही काळीं मनुष्य भक्तिभावनेंत भरून राहूं शकतो. शिवाय "**सकळांसी येथें आहे अधिकार.**" मनुष्यमात्राला ईश्वरावर प्रेम करण्याचा व त्याला शरण असण्याचा **सहजसिद्ध हक्क** आहे. पण ही गोष्ट लक्षांत ठेविली पाहिजे कीं, भक्तिमार्ग "सुलभ बहुसोपा" याचा अर्थ एवढाच कीं, या मार्गाला लागण्यांत प्रारंभीं कोणत्याहि प्रकारचें काठिण्य वाटत नाहीं. पण या मार्गाला एकदां लागल्यानंतर शेवटला मुक्काम गांठण्यासाठीं साधकाला सतत सदाचरणरूपी कडक पथ्य सावधानतेनें सांभाळावें लागतें; मात्र इतर मार्गांत मध्यंतरीं वैराग्य, अभ्यास, ध्यान, धारणा, प्रत्याहार इत्यादि ज्या पायऱ्या आपणांस दक्षतेनें व आपल्या प्रयत्नानें आक्रमण कराव्या लागतात, त्या सर्व पायऱ्या भक्तसाधकाकडून आपो-आप त्याला नकळतच ओलांडिल्या जातात.

भक्तीची अंतिम अवस्था म्हणजे जिला **पराभक्ति** अगर ज्ञानोत्तर-भक्ति म्हणतात, तिचें स्वरूप आम्हां साधारण माणसांना जरी अगम्य असलें तरी, **श्रीज्ञानेश्वरींतील** पुढील वचनांवरून त्याची अंधुक कल्पना आपणांस करून घेतां देतां येईल.

**यालागीं तो कर्मयोगी। मी जालाचि मातें भोगी।**
**तारुण्य कां तरुणांगी। जिया परी॥**
**तरंग सर्वांगीं तोय चुंबी। प्रभा सर्वत्र विलसे बिंबीं।**
**नाना अवकाश नभीं। लुंठत जैसा॥**

**कां चंदनाची द्रुती जैसी । चंदनीं भजे अपैसी ॥**
**कां अकृत्रिम शशीं । चंद्रिका ते ॥**
**तैसी क्रिया कीर न साहे । तरी अद्वैतीं भक्ति आहे ॥**
**हें अनुभवाचि जोगें । नव्हे बोला ऐसें ॥**

प्रेमरूपी दोरींत बांधलेलीं पतिपत्नी शरीरानें जरी भिन्नभिन्न व्यवहार करीत असलीं, तरी त्यांच्या हृदयांचें नितान्त ऐक्य झालेलें असल्यामुळें तीं एकमेकांशीं समरस होऊन राहिलेलीं असतात. याचप्रमाणें भक्त मनानें ईश्वराशीं तादात्म्य पावलेला असूनहि बाह्यतः इतरांप्रमाणें आपले व्यवहार करीत असतांना त्याचा भक्त हा बाणा नाहींसा होत नाहीं.

**मीचि होऊनि पांडवा । करिती माझी सेवा ।**
**जैसा वारा कां गगनीं विरे । मग वारेपण वेगळें नुरे ।**
**तेवीं भक्त हे पैज न सरे । जरी ऐक्या आला ॥**
**जरी पवन हालवून पाहिजे । तरी गगनावेगळा देखिजे ।**
**येऱ्हवीं गगन तो सहजें । असे जैसें ॥**
**तसा शरीरीं हन कर्मे । तो भक्त ऐसा गमे ।**
**परी अंतरप्रतीति धर्में । मीचि ज्ञाला ॥**

पण भक्तीच्या या पराकोटीला कोणी कांहीं एकदम जाऊन पोंचत नाहीं. तोही आर्त, जिज्ञासू, अर्थार्थी, अशा कित्येक पायऱ्यांनीं मार्ग क्रमीत आलेला असतो.

शाळेंत नांव घातल्याबरोबर कोणी एकदम एम्. ए. होत नाहीं अथवा मार्ग चालूं लागल्याबरोबर कोणी एकदम मुक्कामीं पोंचत नाहीं.

पण ही गोष्ट लक्षांत न राहिल्यामुळें हल्लीं भक्तांच्या नांवानें जेव्हां तेव्हां बोटें मोडण्याच्या वक्तृत्वाला ऊत आलेला आहे. भक्त ह्मटला कीं, तो आळशी, ऐदी, फुकटखाऊ, टाळकुट्या, अशा शेलक्या विशेषणांनीं सजविला जातो. श्रोत्यांवर आपली छाप पाडून व हशा पिकवून क्षणभर गंमतीचा देखावा करण्यास ही वाग्वृष्टि उपयोगी पडत असली तरी, आपण श्रोत्यांची दिशाभूल करीत आहों, ही गोष्ट वक्त्याच्या लक्षांत येत नाहीं. आपण थोडासा विचार केला पाहिजे, तो असा:

श्रीगीता या जगन्मान्य ग्रंथांत ब्रह्मवादापेक्षां ईश्वरवादाचा अथवा भक्तीचा पुरस्कारच अधिक प्रामुख्यानें केलेला आहे हें, '**मामेकं शरणं व्रज, भक्तियोगमुपाश्रित्य मच्चित्तः सततं भव,**' इत्यादि अनेक वचनांवरून लक्षांत येतें. श्रीमद्भागवत हें तर गीतेवरील जणूं काय भाष्य होय. श्रीसमर्थ रामदास, तुकाराम, एकनाथ, ज्ञानेश्वर इत्यादि अनेक श्रेष्ठ साधुसंतांनीं भक्तीचेंच महत्त्व वर्णिलेलें असून त्यांचे ग्रंथ मोठमोठ्या विचारवंत पंडितांना वंद्य व प्रमाणभूत वाटतात. श्रीसमर्थांनीं आनंदभुवनांत राहूनच राष्ट्राला कार्यप्रवण केलें, तुकाराम महाराजांनीं टाळ कुटीत कुटीतच ब्रह्मज्ञान्यांनाही लाळ घोटायला लाविलें आणि श्रीज्ञानेश्वर 'माझ्या जिवींची आवडी पंढरपुरा नेईन गुढी, अवघाचि संसार सुखाचा करीन, आनंदें भरीन तिन्ही लोक,' असें गात गातच जगद्वंद्य झाले. सध्यांच्या काळांतही देशभक्तीमुळें ज्यांनीं आपणांस तनमनधनानें राष्ट्रकार्यास वाहून घेतलें आहे, अशा ज्ञात्या व कर्त्या पुरुषांमध्येंही पुष्कळ लोक ईश्वरभक्त आहेत. ईश्वराविषयीं उत्कट प्रेम असल्याशिवाय त्यांच्याकडून इतका स्वार्थत्याग करवा होईल ? सारांश 'भक्तांच्या' ठिकाणीं जे दोष दिसतात ते भक्तीचे नसून त्यांच्या मनुष्यपणांतील अवशिष्ट चतुष्पादत्वाचे आहेत. A. B. C. D. X. Y. इत्यादि पदव्यांनीं मंडित झालेले वकील, डॉक्टर, बॅरिस्टर, प्रोफेसर, इत्यादि अनेक छोट्या मोठ्या लोकांच्या दुष्प्रवृत्तींचें आणि निंद्य आचरणाचें आविष्करण वर्तमानपत्रांतून व कोर्टांतून आपल्या पाहण्यांत येतें. त्याचप्रमाणें भक्तिमार्गांत रांगणाऱ्या मनुष्यांच्या दंभ, प्रमाद, आळस इत्यादि चेष्टा ह्या, त्यांच्या मनुष्यपणांतील **पशुत्वाच्या शिलकी राशी** होत. पण शिक्षकपेशांच्या माणसांप्रमाणें भक्तही जनतेच्या तीक्ष्ण डोळ्यांत तेव्हांच येतात; आणि एक्या परीनें हें त्या शिक्षकांचें आणि भक्तांचें खरोखरच भाग्य अथवा त्यांच्यावरील ईश्वरी कृपेचें चिन्ह होय, असें समजलें पाहिजे ! असो, किंबहुना !

सनातन ग्रंथांपैकीं बहुतेक ग्रंथ पद्यात्मक असतात. पण ब्रम्हसूत्रें भक्तिसूत्रें यांसारखे कांहीं सूत्रात्मक असतात. त्यांतील वाक्यें अगर वाक्यांश हीं त्रोटक स्वरूपाचीं व अगदीं आटपशीर आकाराचीं असतात. आणि अशा एकेका सूत्रांत परंपरागत संकेतानें पुष्कळ अर्थ सामाव-

लेला असतो. यामुळें तीं पाठ करून जिव्हाग्रीं वागवण्याला जरी प
सुकर वाटतात तरी, अधिकारी पुरुषांकडून त्यांचें स्पष्टीकरण क
घेतल्याशिवाय तीं तितकींशीं विलोभनीय वाटत नाहींत.

अशा सूत्रात्मक ग्रंथांपैकीं श्रीशांडिल्यमुनींच्या भक्तिसूत्रांवर श्र
**दासगणू** महाराजांनीं ही **भावदीपिका** नांवाची टीका मराठी भा
ओवी प्रबंधांत लिहिलेली आहे. महाराजांनीं अशा रीतीनें महाराष्ट्र
वाचकांच्या हातांत भगवत्प्रेमाचा हा खाऊ देऊन त्यांच्याकरि
आनंदाचें एक नवें दालन उघडून दिलें आहे. महाराजांनीं यापूर्वीं अ
भक्तांच्या गद्यपद्यात्मक चरित्रकथा प्रसिद्ध केलेल्या असून त्या अ
ठिकीणीं कीर्तनप्रसंगीं स्वतः गाऊन दाखविलेल्या आहेत. यामुळें त्यां
व त्यांच्या रसाळ व प्रेमळ वाणीचा आज महाराष्ट्रांत तरी कोणाला नव्य
परिचय करून देण्याला अवसरच राहिलेला नाहीं. महाराजांचें प्रत्येक की
म्हणजे भक्तांचें अंतःकरण ईश्वराच्या ज्ञानानें व प्रेमानें किती मृदु, स
व सुरस झालेलें असतें, यांचें प्रात्यक्षिक दर्शनच होय. अशा कीर्तनां
श्रोत्यांचें अंतःकरण बाह्य प्रपंचांतून जरा बाजूला वेधून घेऊन त्या
जरा गोंजारून व रंजवून भक्तिभावनेनें तें आत्मसन्मुख करावय
असल्या कारणानें, या चरित्रकथांत त्यांनीं श्रुतिमनोहर गोड गीतां
योजना केलेली आढळते, ते योग्यच होय. पण शांडिल्यभक्तिसूत्रां
विषय एकजिनसी निर्भेळ भक्ति अथवा पराभक्ति असल्यामुळें, त्यां
या **भावदीपिकेंत** एकजात ओवीप्रबंधांची सुबद्ध रचना केली आहे. त
पण तींत लोकांना नित्यपरिचित असलेल्या अनेक व्यावहारिक गोष्टं
दृष्टांत जागोजाग दिलेले असल्यामुळें विषयाचें विवरण विशद व आक
झालें आहे.

श्रीशांडिल्यमुनी भक्ति म्हणजे '**सा परानुरक्तिरीश्वरे**' असें म्हणता
श्रीनारद ऋषी '**सा त्वस्मिन् परमप्रेमरूपा अमृतस्वरूपा च**' असे
सांगतात. दोघेही ईश्वराचे आवडते भक्त्याचार्य असल्यामुळें, **दोहीं अ
एक बोलणें, दोहीं पायीं एक चालणें**' या न्यायानें दोघेही एक
सांगतात.

या दीपिकेंत पराभक्तीच्या स्वरूपाचें व तिच्या विशिष्ट महत्त्वानं

जरी मुख्यतः व्याख्यान असलें तरी निरूपणाच्या अनुषंगानें तींत भक्ती-संबंधीं अनेक उपयुक्त गोष्टी आलेल्या आहेतः—

*** ज्ञान प्रेमाखी उपजेवी । स्मरण त्यासी अढळ करवी**
*** ईश्वराची व्हाया प्राप्ती । मुख्य एक पराभक्ति ।**
**पृथक् पृथक् न कामा येती । ज्ञान योग कर्मादिक ॥**
**भक्ती देवादिकांची । आहे अपरा स्वरूपाची ।**
**तीच निष्काम केल्या साची । पराभक्ती होत असे ॥**
*** योग भक्तांचें अंग सत्य ।**

भक्ती अनुरागरूप म्हणून त्याज्य, असें कोणी म्हणेल ह्याचें निरसन ' उत्तमास्पदत्वात् संगवत् ' या सूत्राच्या व्याख्यानांत 'ज्या प्रीतीचा विषय हरी, असेल ती सेव्यचि । ' असें सांगितलें आहे.

भक्तींत श्रद्धेचें स्थान कोणतें, जीवशिवांचें भिन्नपण आणि अभिन्नपण कोणत्या दृष्टीनें व तें कसें, सद्भक्तांचीं लक्षणें कोणतीं, इतर गौणी भक्तींची उपयुक्तता काय, मध्यम, उत्तम व कनिष्ठ भक्तांना शेवटीं अंतिम फळ एकच मिळतें कसें, एकांत सेवनाचें महत्त्व काय, इत्यादि अनेक उपयुक्त विषयांच्या प्रसंगोपात्त व्याख्यानांमुळें अवधानाचा प्रवाह सतत सारखा वाहाता राहातो. मुंडक, श्वेताश्वतर, गीता इत्यादि मोठ्या ग्रंथांतील प्रमाणवचनांनीं विवेचनास जागोजाग गौरविलें असल्यामुळें त्या त्या ग्रंथांसंबंधीं वाचकांच्या मनांत आस्था व कुतूहल हीं सहजच उत्पन्न होतात. अशा रीतीनें वर्तमान व भविष्यत् अशा भाविक मुमुक्षु लोकांना आवडेल असा हा एक संग्राह्य ग्रंथ श्रीदासगणूमहाराजांनीं प्रसिद्ध करून महाराष्ट्रीय जनतेस ऋणी करून ठेवलें आहे. या ऋणांतून अंशतः तरी मुक्त होण्यासाठीं महाराष्ट्रीय वाचक या ग्रंथाचें वाचन व मनन करून महाराजांच्या या कृतीचें चीज करतील, अशी मला सबळ आशा आहे.

**भक्तिसूत्रें** एवढ्याच नांवानें केवळ बिचकून जाऊन कांहीं वाचक एकदमच ग्रंथ दृष्टिआड करतील, असें होऊं नये म्हणून मुद्दाम थोड्याशा अधिक विस्तारानें लिहिलेल्या या प्रस्तावनेबद्दल सर्वांची क्षमा याचून

आणि महाराजांच्या या कृतीबद्दल त्यांना अभिनंदनपूर्वक धन्यवाद देण्यासाठीं त्यांचेपुढें पुढील भगवद्वचन मांडून एथें इति-शम् म्हणतों.

**" य एतन्मम भक्तेषु संप्रदद्यात् सुपुष्कलम् ।**
**तस्याहं ब्रह्मदायस्य ददाम्यात्मानमात्मना ॥ "**

श्रीमद्भागवत ११-२९-२६

पुणें, टिळकवाडी
पौष वद्य ११ शके १८६१

भक्तभक्तांचा ऋणाईत
व्यंकटेश त्र्यंबक चांफेकर, बी. ए.;
बी. एस्सी., पेन्शनर, व्हा. प्रि. ट्रे.
कॉ. फॉर मेन पुणें.

---



श्रीशांडिल्य-ऋषि.

॥ श्रीराम समर्थ ॥

# श्रीशांडिल्यऋषींच्या पवित्र सहवासांत !



**ते सभाग्या मनुष्येषु कृतार्था नृप ! निश्चितम् ।**
**स्मरन्ति ये स्मारयन्ति हरेर्नाम कलौ युगे ॥**

—श्रीमद्भागवत.

[ **भावार्थः**—हे राजन्, जे पुरुष या कलियुगांत श्रीहरीच्या नांवाचें स्वतः स्मरण करितात, अगर इतरांस स्मरण करण्यास लावतात, तेच पुरुष खरोखर भाग्यवान् असून धन्य होत ! ]

---

प्राचीन काळीं आर्य ऋषींनीं ज्याप्रमाणें महाभारत, रामायण यांसारखे विस्तारपूर्वक लिहिलेले प्रचंड ग्रंथ निर्माण करून जगाला स्तिमित करून टाकलें, तद्वत्च थोड्या वाक्यांत पुष्कळसा अर्थ असणारे सूत्रमय वाक्यांचे लहान लहान ग्रंथ करूनही जगाला चकित करून सोडलें आहे ! अशा सूत्रमय वाङ्मयाच्या प्रकारांपैकीं प्रस्तुत श्रीशांडिल्य ऋषांनीं लिहिलेलीं " भक्तिसूत्रें " हा एक चिमुकला ग्रंथ आहे. श्रीशांडिल्य ऋषींनीं निरनिराळ्या ग्रंथांत लिहिलेली " भक्ति " या विषयावरील सूत्रें या ग्रंथांत एकत्र समाविष्ट केलेलीं आहेत. उपनिषदें, श्रुति, स्मृति, वेद वगैरे आर्यांच्या महान् ग्रंथांत अशींच सूत्रमय वाक्यें आढळतात. एवढेंच नाहीं तर, अर्वाचीन काळांतील संतांचीही वाणी, अशा प्रकारच्या वाक्यांनीं अलंकृत झालेली आहे. श्रीतुकाराम, श्रीज्ञानेश्वर, श्रीनामदेव, श्रीएकनाथ वगैरे संतांच्या अभंगांच्या, एक–एका चरणावर विस्तारपूर्वक कीर्तन व प्रवचन करितां येईल, एवढेंच नाहीं तर ग्रंथही निर्माण होऊं शकतील, अशा प्रकारचीं सूत्रें त्यांनीं आपल्या वाङ्मयांत वापरलेलीं आहेत आणि म्हणूनच त्यांना आम्ही ' तत्त्वज्ञ ' अशा नांवानें संबोधितों !

ताक घुसळून लोणी काढावें, निरनिराळ्या असंख्य फुलातून मध गोळा करून मधुपानें एकत्र मध सांठवावा, तशाच प्रकारांपैकीं हा एक प्रकार आहे. जगाचा अनुभव, थोर लोकांचा सहवास, सृष्टिनिरीक्षण व चिरंतन एकाग्रपणें

विचार-मंथन केल्यानंतरच, थोर लोकांच्या विचारसृष्टींत जीं तत्त्वें निर्माण होतात, तींच 'सूत्रें' होत व हीं सूत्रें जनतेला जशीं बोधप्रद तशींच मार्ग-दर्शकही होतात व म्हणूनच हीं सूत्रें वर्तमानकाळीं तशींच भविष्यकाळींही 'अमर' आहेत!

अशा अनुभवजन्य सूत्रांचा 'प्रमाण' ( Authority ) म्हणून कोणत्याही काळीं उपयोग होतो व या यांच्या उपयुक्ततेमुळेंच अशीं सूत्रें चिरस्थायी होतात.

श्रीभगवान् शंकराला एक 'तिसरा नेत्र' असल्याचें वर्णन आहे व तो नेत्र म्हणजेच 'विचारनेत्र' ( Concentration of mind ) होय! ज्याला आपल्या दोन्ही डोळ्यांपेक्षांही **विशेष दिसतें**, अशांनाच हा तृतीय नेत्र असतो! व आपले सर्व विचार एकत्र केंद्रीभूत करून ज्या वेळेस ते एकादें तत्त्व काढितात, एखादें न उमलणारें कोडें सोडवितात, अगर प्रतिभेनें एखाद्या मुद्यावर "प्रकाश" पाडतात, अशा वेळींच "असामान्य कोटींतील थोर तत्त्वज्ञ" म्हणून ते ओळखले जातात!

अफाट सागरात जहाजांना ज्याप्रमाणें दीपस्तंभाचा उपयोग होतो, रस्त्यानें प्रवाश्यांला ज्याप्रमाणें मार्गदर्शक पाट्याचा उपयोग होतो, तद्वत्च दुस्तर संसारसागर तरून जाण्याला व ईश्वराचें सान्निध्य प्राप्त करून घेण्याला हीं 'भक्तिसूत्रें' उपयुक्त होत.

उद्दिष्ट लक्ष्याकडे स्थिर दृष्टि, व हस्तकौशल्य यानें जसें शरसंधान चुकत नाहीं तद्वत्च अशा सूत्रांचें योग्य मनन करून तद्वत् **वर्णन करण्यानें** इप्सित सिद्धि मिळाल्याखेरीज राहत नाहीं.

श्रीशांडिल्य ऋषींचीं "भक्ति" या विषयावरील हीं १०० सूत्रें संस्कृत भाषेंत आहेत. अशींच सूत्रमय 'भक्तिसूत्रें' गर्गाचार्य, बादरायण व नारद* ह्या महर्षींनींही संकृतमध्येंच केलेलीं आहेत. आतां श्रीशांडिल्यऋषिकृत भक्ति-सूत्रांचा विचार करण्यापूर्वी, आपण त्यांच्या त्रोटक जीवनचारित्र्याकडे वळूं.

## श्रीशांडिल्य-चरित्र

श्रीशांडिल्यऋषी हे कश्यप वंशांतील महर्षि देवल यांचे पुत्र होत. हे यज्ञ-विधींत कुशल असल्यावरून दिलीप राजाचे पुरोहित झाले होते. कौशिक,

* श्रीदासगणूमहाराजांनीं "नारद-भक्तिसूत्रांवर"ही एक टीकात्मक ओंवीबद्ध ग्रंथ केला आहे. पण तो अजून प्रसिद्ध झाला नाहीं. द्रव्यसाहाय्य मिळाल्यास तोही ग्रंथ प्रसिद्ध करण्यांत येईल. — **संपादक**

गौतम, केशोर्यकात्त्य, वात्स्य, वैजवाप व कुश्रि हे श्रीशांडिल्य ऋषींचे गुरु होत. श्रीशांडिल्य ऋषींना कौंडिण्य, आग्निवेश्य, वात्स्य वामकक्षायण, वैष्ठपुरेय व भारद्वाज असे शिष्य होते. भक्तिसूत्रांखेरीज शांडिल्यस्मृति, शांडिल्यधर्मसूत्र व शांडिल्यतत्त्वदीपिका असे यांनीं तीन ग्रंथ लिहिले. यांची एक संहिताही प्रसिद्ध आहे. कांहीं कांहीं ठिकाणीं नंदगोपांचे पुरोहित ह्मणूनही यांचा उल्लेख आला आहे. शतानीकाच्या पुत्रेष्टि-यज्ञायध्यें हे मुख्य ऋत्विक् होते. कांहीं कांहीं पुराणांत ब्रह्माचा सारथी म्हणूनही याचे वर्णन आले आहे. यांनी प्रभास क्षेत्रांत शिवालिंग स्थापन करून दिव्य१००वर्षे शंकराची घोर तपश्चर्या व प्रेमपूर्वक भक्ति केली. त्याचें फळ म्हणून चंद्रमौली शंकर प्रसन्न झाले व त्यांनीं श्रीशांडिल्य ऋषींनीं तत्त्वज्ञान, भगवद्भक्ति व अष्टसिद्धि वर म्हणून दिल्या. विश्वामित्र मुनि त्रिशंकु राजाचे घरी यज्ञ करीत असतांना हे होत्याचे रूपानें त्या ठिकाणीं हजर होते. भिष्माचार्य शरपंजरी पडले, त्या वेळीसुद्धां हे त्या ठिकाणीं हजर असल्याचा उल्लेख सांपडतो. श्रीशांडिल्य ऋषींच्या प्रतापाने सूर्योदय होणेंच बंद झालें होतें ! तेव्हां अनसूयेनें श्रीशांडिल्य ऋषीस सूर्योदय पूर्ववत् होण्याविषयीं प्रार्थना केल्यावरून तो होऊं लागला. निरनिराळ्या धर्मस्मृति निर्माण करणारे शंख व लिखित असे दोन पुत्र श्रीशांडिल्य ऋषीस होते.

## श्रीशांडिल्य-भक्तिसूत्रें

सर्व श्रुतींचा समन्वय करून भगवान् वेदव्यासाने ज्याप्रमाणे ज्ञानपर ‘ ब्रह्मसूत्रे ’ लिहिलीं, तद्वत् श्रुतींचा व गीतेचा भक्तिपर तात्पर्याचा एक लहान पण महत्त्वाचा असा ग्रंथ ‘ भक्तिसूत्रें ’ हा श्रीशांडिल्य ऋषीने लिहिला. या भक्ति-सूत्रांचे तीन अध्याय आहेत व प्रत्येक अध्यायांत दोनदोन आन्हिकें आहेत. यावरून असें वाटतें कीं, त्यांनीं हा ग्रंथ ६ दिवसांत लिहिला असावा.

आत्मरत्यविरोधेनेति शांडिल्यः ( नारदभक्तिसूत्र १८ )

आत्मानुसंधान कायम ठेवून नवविधप्रकारें ईश्वरसेवा करणे हिलाच भक्ति असे म्हणावें. हीं भक्तिलक्षणाचीं शांडिल्यसूत्रें बिकट असून अद्वैतपर आहेत. आत्मरति मिळणें हें ज्ञान्यांनाच शक्य आहे.

त्यांच्या मतांचा सारांश असा आहे कीं, जीवाचें ब्रह्मभावापन्न होणें हीच मुक्ति होय. ब्रम्हभावोपलब्धिसाठीं हाच उपाय भगवान् श्रीकृष्णाने श्रीमद्भगवद्गीतेंतही सांगितला आहेः—

**मां च योऽव्यभिचारेण भक्तियोगेन सेवते ।**
**स गुणान् समतीत्यैतान् ब्रह्मभूयाय कल्पते ॥**

या भक्तीनें त्रिगुणात्मक अंतःकरणाचा लय होऊन ब्रम्हानंदाचा प्रकाश होतो. यामुळें आत्मज्ञानाची व्यर्थताही होत नाहीं. कारण अश्रद्धारूपी मलाला दूर करण्यासाठीं ज्ञानाची जरूरी आहे. श्रीमद्भगवद्गीतेंत जागोजागीं भक्तीच्या साधनाच्या रूपानें ज्ञानाची चर्चा आली आहे. **ईश्वरावर परमप्रीति करणें, हेंच भक्तीचें लक्षण होय.** या भक्तीनेंच जीव भगवन्मय होऊन जातो. त्याचें अंतःकरण अंतःकरणाच्या रूपानें निराळें न राहतां, परमेश्वरांत मिळून जातें. हीच भक्ति.श्रीनारद या तत्त्वज्ञ व रसज्ञ भक्ताने भक्तीच्या स्वरूपाचें वर्णन 'परानुरागरूपा' (भक्तिसूत्र २) असें केले आहे तर श्रीशांडिल्यऋषि 'परमप्रेमरूपा' (सूत्र २) तसेंच 'सा परानुरक्तिरीश्वरे' (भावार्थ—ईश्वरावर नितांत प्रेम अथवा अनुरक्ति यालाच भक्ति म्हणावें) असे वर्णन करितात. त्याचा अर्थ हाच कीं, सर्व विश्वाचा आत्मरूप जो एक परमात्मा त्याला सर्व भावानें आत्मसमर्पण करणें म्हणजेच त्यांत विलीन होणें होय. हिलाच भक्ति म्हणावें व ही भक्ति करण्यास सर्वांस अधिकार आहे. यांत जाति, विद्या, रूप, कुल, धन व क्रियेचा भेद नाहीं (नारदभक्तिसूत्र ७२) एवढेंच नाहीं, तर निंदित योनीपर्यंत सर्वांनाच भक्ति करण्याचा अधिकार आहे (शांडिल्यसूत्र ७८)

"सा कस्म परमप्रेमरूपा," "अमृतरूपा च," "यज्ज्ञात्वा मत्तो भवति, स्तब्धो भवति, आत्मारामो भवति इत्यादि सूत्रद्वारें श्रीनारदमहर्षीनेंही ईश्वरावरील अढळ प्रेमालाच भक्तीचें लक्षण ठरविलें आहे.

ईश्वरी प्रेमांत मग्न झाल्यावर भक्ताला बाह्य जगताचें भान रहात नाहीं। एखाद्या उन्मत्त–स्तब्धाप्रमाणें रात्रंदिवस परमात्म्याच्याकडेच त्याची तंद्री लागून राहते. सहस्रदल कमलाप्रमाणें त्याचें हृदयकमल विकसित होऊन श्रीभगवानाच्या पवित्र चरणकमलांत विलीन होतें. मानवी आयुष्याचें हेंच एक सार व ध्येय आहे व याच्या प्राप्तीसाठींच भक्ति–मीमांसाशास्त्राचा जन्म झाला आहे.

अशा रीतीनें महर्षि शांडिल्यांनीं भगवद्भक्तीची उपयुक्तता व ज्ञानाची अपेक्षा व श्रेष्ठता सिद्ध केली आहे. भक्तीचे प्रकार, तिचें साधन व त्यांच्या विघ्नांची

निवृत्ति इत्यादिकांचे मोठें सुंदर विवेचन त्यांनीं केलें आहे. भगवद्भक्तांनीं त्याचें अध्ययन अवश्यमेव केलें पाहिजे.

*　　　*　　　*

## श्रीदासगणूविरचित

# श्रीशांडिल्यभक्तिसूत्र—भावदीपिका.

**श्रीदासगणू महाराज** हे आपलें लिखाण बहुतकरून श्रीक्षेत्र शिरडींत, श्रीक्षेत्र पंढरीत, अन्य पुण्यक्षेत्रीं, श्रीगोदातटाकीं किंवा नांदेड येथें करीत असतात. त्या नियमाप्रमाणें त्यांनीं हें वरील लिखाण संतश्रेष्ठ श्रीसाईबाबांच्या पायांजवळ शिर्डी येथें सन १९३८–३९ या दोन सालांत मिळून सवडीनुसार लिहिलें व श्रीसांवतामाळी समाधीसमोर अरण येथें पुरें केलें. त्यांनीं ही संस्कृत शांडिल्य-सूत्रांवरील मराठी ओंवीबद्ध टीका, ' स्वप्नेश्वराच्या ' संस्कृत टीकेच्या आधारें रचिली आहे. वरील ग्रंथावरील **अशा तऱ्हेची काव्यमय टीका, मराठींत ही पहिल्याप्रथमच प्रसिद्ध होत आहे, हें या ग्रंथाचें वैशिष्ट्य होय.**

हीं भक्तिलक्षणाचीं संस्कृत कठीण सूत्रें आपल्या प्रासादिक व प्रेमळ वाणीतून मराठी भाषाद्वारें, बहुजनसमाजाच्या उपयोगासाठीं **श्रीदासगणू महाराजांनीं** व्यावहारिक दृष्टांत वगैरे देऊन अगदीं सोप्या पद्धतीनें उलगडून सांगितलीं आहेत. भक्तिसांप्रदायात **श्रीदासगणू महाराज** हे सर्वश्रेष्ठ असल्यामुळें, या श्रीशांडिल्य सूत्रांवरील टीकेस एक प्रकारचें अनुभवजन्य स्वरूप प्राप्त झालें आहे. कोमल हृदय, आपद्ग्रस्तांविषयीं अनुकंपा, देशबांधवांविषयींचें नितांत प्रेम व त्यांच्या हिताविषयीं अखंड तळमळणारें मन, सर्व भूतमात्रांच्या कल्याणाची सदिच्छा व ईश्वरावरील अढळ प्रेम, या गुणांमुळें **श्रीदासगणू महाराज** हे या विसाव्या शतकांतील 'आदर्श संत' म्हणून सुविख्यात आहेतच पण रसाळ व प्रासादिक वाङ्मयसेवक म्हणूनहीं साहित्यसेवकांना त्यांना सर्वश्रेष्ठ पद देऊन त्यांचा गौरव करणें उचित आहे, अशाच प्रकारची त्यांच्याकडून अफाट व सुंदर वाङ्मयनिर्मिति झालेली आहे !

ही टीका लिहून त्यांनीं सर्व भक्तिमार्गीय जनांना खरोखरी उपकृत करून ठेविलें आहे.

वरील सुंदर ग्रंथांतील, कांहीं थोडें निवडक वेंचे, वाचकांच्या अवलोकनार्थ, आम्ही याखालीं देत आहों:—

## व्यावहारिक सुलभ दृष्टांत.

म्हणजे मोक्ष समजा एक खीर । तेथें पय हें ज्ञान साचार ।
त्यांत भक्तीची साखर । मिळवाल तेव्हां खीर होई ॥ १०१ ॥
त्याच श्रोते पयाठायीं । नास्तिक विष मिसळल्या पाहीं ।
तें सुखाऐवजीं प्राण घेई । साच सेवनकर्त्यांचा ॥ १०२ ॥

× × ×

पहा कडें आंगठी चंद्रहार । हे अवघेच आहेत भांगार ।
परी नामरूपांचे प्रकार । शुद्ध सोनें जाणत नसे ॥ ३४२ ॥

× × ×

उलट कृष्णानें यादवांसी । चढविलें आहे लौकिकासी ।
जैंवी मृगमदानें मृत्तिकेसी । श्रेष्ठपणा आणावा ॥ ७८८ ॥

× × ×

‘ मर मेल्या ’ म्हणे जननी । आपल्या बालकालागोनी ।
परी अंतर पाहतां शोधोनी । भाव मातेचा निराळा ! ॥६६६॥

× × ×

जैंवी एक्या गांवाप्रत । मार्ग वाटा असती बहुत ।
परि त्यायोगें ना फरक होत । ग्रामाचिये ठिकाणीं ॥ ६३२ ॥
तैसेंच या भक्ताठायीं । मार्गी भिन्नपणा राही ।
परी तत्त्वाचियां ठायीं । फरक न पडे येतुला ॥ ६३३ ॥

× × ×

### म्हण.

पायावांचून इमल्याची । उभारणी ना करणें बरें ॥ ९३० ॥

× × ×

## ईश्वराचीं असंख्य नामें.

ईश्वरवाचक नामें सारीं । तुझींच कीं रे श्रीहरि ! ।
मेघांतून पडतां वारी । नामें धरी गोदा भिमा ॥ ८ ॥

× × ×

## पराभक्तीची व्याख्या.

मनासीं जें आवडे कांहीं । त्याचें नांव प्रेम पाही ।
तीं आवडी ईश्वराठायीं । लागल्या होय भक्ति परा ॥ ६९ ॥

× × ×

## भक्तिमाहात्म्य.

गंधामाजी कस्तुरी । पर्वतामाजी हिमागिरी ॥
किंवा देवांत त्रिपुरारी । वा सरितेमाजी जन्हुतनया ॥२४५॥
तीर्थामाजी गोदावरी । वा क्षेत्रामाजी पंढरी ॥
तेवीं अवघ्या साधनाभीतरीं । श्रेष्ठ पंथ भक्तीचा ॥ २४६ ॥

× × ×

## सुलभवर्णनशैली.

जग शहाणें करण्या भलें । प्रथम कर्मकांड प्रतिपादिलें ।
जैसे पंतोजीनें शिकविलें । मोठें अक्षर प्रथमता ॥ १३०३ ॥
तें मोठें अक्षर वळल्यावर । फरडा होतो लिहिणार ।
तो बंदच्या बंद भराभर । लिहूनियां टाकीतसे ॥ १३०४ ॥

\+ + +

## तत्त्वप्रतिपादनाची सोपी रीत

मीरा घाली मोतीचूर । जनी कांदाभाकर ।
परी दोहींला शारंगधर । पावला आहे सारखा ॥ १००१ ॥
या दोहींच्या उपचाराला । देव नाहीं भाळला ।
या दोहींच्या अनन्यतेला । झाला आहे ईश्वर वश ॥१००२॥

## आभारप्रदर्शन

प्रस्तुत ग्रंथाची प्रस्तावना श्रीयुत **त्र्यं. त्र्यं. चांफेकर**, बी. ए., बी.एस्सी. (उर्फ वैकुंठराय) पेन्शनर, प्रिन्सिपॉल ट्रेनिंग कॉलेज फॉर मेन, पुणे, या नामवंत लेखकानें लिहून दिली, एवढेच नव्हे, तर ग्रंथाचीं प्रुफेंही मोठ्या आनंदानें तपासून दिलीं, त्याबद्दल आम्ही त्यांचे अत्यंत मनःपूर्वक आभार

मानतों. प्रख्यात मराठी 'चित्रमय जगत्' मासिकांत अनेक शास्त्रीय, धार्मिक व वाङ्मयात्मक उत्कृष्ट लेख लिहिल्यामुळे 'वैकुंठराय' यांचे नांव सर्वतोपरी प्रसिद्ध आहे. त्यांच्या विचारप्रवर्तक व ज्ञानप्रद लेखांनीं वाचकांस एकाकाळीं चटका लाविला होता, एवढें सांगितलें, म्हणजे त्यांच्या लिखणाची योग्यता वाचकांस कळून येईल. पुणें येथील सुप्रसिद्ध सत्पुरुष ह. भ. प. **श्रीकेशवराव महाराज देशमुख** बी. ए. यांचे हे एक एकनिष्ठ शिष्य आहेत. एवढें म्हटलें म्हणजे त्यांची अध्यात्मप्रगति किती श्रेष्ठ दर्जाची आहे, हे निराळें सांगणे नको! चित्रशाळेची 'सटीप ज्ञानेश्वरी' यांच्याच संपादकत्वाखाली प्रसिद्ध झाली आहे. त्यांचें 'नारदभक्तिसूत्रे' मराठी सरळ अर्थासहित छापून निघाले आहे. 'भक्तियोग' म्हणजेच श्रीज्ञानेश्वरांतील १२वा अध्याय, त्यांचा प्रकाशित झाला आहे. असो. अशा प्रकारे वेदांतावर व धर्मग्रंथावर त्यांचा बराच व्यासंग आहे.

सोबतची त्यांची प्रस्तावना वाचली म्हणजे अध्यात्मज्ञान त्यांच्या अंगीं किती मुरले आहे, याची बरोबर कल्पना होते! अधिकारयुक्त भारदस्त विचारसरणी व आजच्या व्यवहारात येणारे अनुभव यानीं ही प्रस्तावना कशी खुलून दिसते!

या ग्रंथास अमळनेर येथील **श्रीमंत प्रतापशेट** ह्यांनीं जे द्रव्यसाहाय्य केलें आहे, त्याबद्दल आम्ही त्यांचे अत्यंत आभारी आहोत. अमळनेर येथील तत्त्वज्ञानमंदिराची स्थापना, तसेंच "तत्त्वज्ञानमंदिर त्रैमासिकाचें" जनकत्व यांचे सर्व श्रेय **श्रीमंत प्रतापशेट** यांचेकडेच आहे. हिंदुधर्माचा अभिमान, वेदांताची आवड, व दातृत्व या गुणांनीं **श्रीमंत प्रतापशेट** ह्यांनीं आपलें नांव या हिंदुस्थानांत अजरामर करून ठेविलें आहे!

या ग्रंथाची छपाई, श्री. शंकरराव जोशी, मॅनेजर, चित्रशाळा प्रेस, यांनीं फार चांगल्या प्रकारे व वेळेवर करून दिली, त्याबद्दल त्यांचेही आम्ही फार आभारी आहोंत.

शेवटीं, **श्रीदासगणू महाराजांच्या** ठिकाणीं असणाऱ्या भक्तिजलांत, **वाढलेलें हें विचाररूपी कमल**, मी त्यांच्याच पवित्र चरणीं समर्पण करून, वाचकांची सप्रेम रजा घेतों.

श्रीरामदास नवमी,
माघ कृ. ९ शके १८६१
(ता. २-३-१९४०)

आपला नम्र संतचरणरज,
**विठ्ठल लक्ष्मण सुबंध.**



ह. भ. प. श्रीदासगणू महाराज

( प्रस्तुत श्रीशांडिल्यभक्तिसूत्र-भावदीपिकेचे लेखक )

॥ श्रीशंकर ॥

## ॥ श्रीदासगणूविरचित ॥

# ॥ श्रीशांडिल्यभक्तिसूत्र भावदीपिका ॥

श्रीगणेशाय नमः । ॐ नमोजी गणपती । गौरीपुत्रा प्रतापज्योति । भक्तवत्सला विमलकीर्ति । पाव मातें मयूरेश्वरा ॥१॥ हे पंढरीशा पूर्णब्रह्मा । मायातीता पुरुषोत्तमा । सद्भक्तांच्या निवासधामा । पतितपावना कृपानिधे ॥२॥ देवा तुम्ही आजवर । असंख्य तारिले नारीनर । ज्यांनी तव पदीं ठेविलें शिर । ते आजिक्य झाले भुवनत्रयीं ॥३॥ त्या तुझ्या प्राप्तिकरितां । शास्त्रालागीं धुंडाळितां । तेथें न एकवाक्यता । आतां काय करूं तरी ॥४॥ शास्त्रें मतमतांतरें माजलीं । शब्दच्छला पर्वणी आली । त्या योगें द्वेषवल्ली । वाढूं लागली समाजांत । ॥५॥ म्हणून त्या नाना मतां । मी न पाहें सर्वथा । तुलाच एक पंढरीनाथा । दृढ धरोनि राहतों ॥६॥ सर्व मतांचा वर्ण्य विषय । जगदाधार ईश होय । आणि ईश्वर तो तूं पंढरीराय । ऐसें संत सांगती ॥७॥ ईश्वरवाचक नामें सारीं । तुझींच कीं रे श्रीहरि । मेघांतून पडतां वारि । नामें धरी गोदा-भीमा ॥८॥ जैसी आवडी जयाला । तैसा तो ध्यायी तुला । नगाचा बाजार भरला । परि सोनेंच सर्व ठायीं ॥९॥ तूं सच्चिदानंद सनातन । तूंच देवा रुक्मिणीरमण । पिनाकपाणी भाललोचन । उमापति तूंच की ॥१०॥ ऐसें तुझें रूप अचिंत्य । वेदही झाले कुंठित । ऐसे अगम्य तत्त्व लाभत । एक अहेतुक भक्तीनें ॥११॥ संतांनीं पिटीला डांगोरा । भगवान आहे भीमातीरा । भूवैकुंठ पंढरपुरा । त्याची भक्ती करा हो ॥१२॥ ऐसें आजपर्यंत । ज्ञानेश नामा एकनाथ । तुकाराम स्वामी समर्थ । सांगत आले आम्हांतें ॥१३॥ संतांची योग्यता थोर । ते चालते बोलते परमेश्वर । त्यांचें सांगणें निराधार । होईल कैसें दयाळा ॥१४॥ त्या तुझ्या प्राप्तीचीं । साधनें नानाविध

साचीं । त्यांत पराभक्तीची । महती गाती संत सारे ॥ १५ ॥ ती पराभक्ति साधावया । सांगते झाले सदुपाया । सांगोपांग करूनियां । विचार शांडिल्यादि ऋषि ॥ १६ ॥ शांडिल्य, गर्ग बादरायण । चौथा ब्रह्मदेवाचा नंदन । ऐशा चौघांनीं केलीं कथन । भक्तिसूत्रें गीर्वाणीं ॥ १७ ॥ तीं शांडिल्यसूत्रें मराठींत । आणावीं हा धरला हेत । या माझ्या कृत्याप्रत । साह्य पाहिजे तुझें देवा ॥ १८ ॥ मी अज्ञान मूढमति । परि शरण आलों तुजप्रति । परिसाची झाल्या संगति । जाय लोहाचा लोहपणा ॥१९॥ लेकराची अवघी आळ । माता पुरविते सकळ। मी लेंकरूं तूं घननीळ । समर्थ माझी माय महा ॥ २० ॥ शांडिल्य-सूत्रें रचावया । तुझ्या भरवंसीं देवराया । आरंभ करितों पाव सदया । चित्तीं वास करावा ॥ २१ ॥ तुझ्या द्वारींचा याचक । गेला न कोणी विन्मुख । ऐसा इतिहास आहे देख । आज-वरीचा पांडुरंगा ॥ २२ ॥ त्या कीर्तीस कमीपणा । आणूं नको रुक्मिणीरमणा । दासगणू लागला चरणां । आतां अभय असूं दे ॥ २३ ॥ हे पंचतुंडा उमापति । प्रसीद मातें दक्षिणामूर्ति। माझ्या चित्तीं करून वसती । वदवा शांडिल्यसूत्रांतें ॥ २४ ॥ हे पंचगंगातटवासिनी । हे कुलाचे कुलस्वामिनी । महालक्ष्मी तुझ्या चरणीं । नमन करी दासगणू ॥ २५ ॥ हे तुळजेभवानी अपर्णे । साह्य मातें सदैव करणें । मी तुझें लेंकरूं तान्हें । अव्हेर माझा करूं नको ॥ २६ ॥ श्रीसज्जनगडस्थ रामदास । तुकारामादि पुण्यपुरुष । अध्यात्मवेत्ता ज्ञानेश । कार्यारंभीं वंदितों ॥ २७ ॥ हे महानुभाव बाबा सांई । श्री वामनशास्त्री माझे आई । उभयतां पावा लवलाही । दासगणूकारणें ॥ २८ ॥ आतां शांडिल्यादि ऋषीश्वरां । नमन माझें सूत्रकारां। तेवीं टीकाकार स्वप्नेश्वरां । आदरेंसी असो हें ॥ २९ ॥ तुम्हीं मनीं आणिल्यास । कार्य जाईल शेवटास । आतां वंदन श्रोतयांस । शांडिल्यसूत्रें ऐका हीं ॥ ३० ॥ आधींच तुम्ही उदार । श्रवणा बसावें सादर। तुमच्या कृपेचा महिमा थोर । तो वानूं कोठवरी ॥ ३१ ॥ श्रोते तुमच्या कृपेनें । मी हें करीन बोलणें । वरचेवरी

अवलोकणें । कृपाकटाक्षें मजलागीं ॥३२॥ जैसें पाहून इंदूशीं भरती येते सागरासी । म्हणजे लाटा उठती जलासी । चंद्र-माच्या दर्शनें ॥ ३३ ॥ तुम्ही श्रोते निशाकर । मी वक्ता सागर । तुमच्या प्रोत्साहनें उठणार । आहेत मशीं व्याख्यानलाटा ॥३४॥ आतां व्हावें सावधान । शांडिल्यसूत्रां करा श्रवण । माय अवघे आपण । मी लेंकरूं तुम्हांपुढें ॥ ३५ ॥ लेंकरूं आरुष वाणी वद्ते । माय तिचें चोज करिते । मी देतों परवच्चातें । शिक-विलेल्या पाढ्याचा ॥ ३६ ॥ माझें कांहीं महत्त्व नाहीं । तें अवघें तुम्हांठायीं । सजल घन नाचविता होई । निजदर्शनें मोराला ॥ ३७ ॥

## ॐअथातो भक्तिजिज्ञासा ॥ १ ॥

अथ हा शब्द देख । आहे ग्रंथारंभवाचक । भक्ति हाच मार्ग एक । आहे भगवत्प्राप्तीचा ॥ ३८ ॥ सर्वसाधनांमाझारीं । भक्ति हीच हितकारी । या भक्तिपंथाची नये सरी । कोणत्याही मार्गातें ॥ ३९ ॥ मोक्ष इच्छा अंतरीं । जयाचिया होय खरी । तोच येथला अधिकारी । आहे पहा निःसंशय ॥ ४० ॥ मोक्ष म्हणजे मुक्ति । ती साधेल केल्या भक्ति । भक्ति भेटवी श्रीपती । जो सच्चिदानंद असे कां ॥ ४१ ॥ तेंच मोक्ष मिळवणें । जन्म-मृत्यु टाळणें । आणि सच्चिदानंदतत्त्वीं होणें । पूर्णपणें समरस ॥ ४२ ॥ आतां किती एक ज्ञाते म्हणती । ज्ञानेंच होय मोक्ष-प्राप्ति । या ज्ञानाची पाहतां स्थिति । ते निवारी अज्ञाना ॥४३॥ ज्ञानें अज्ञान गेलें । परि अनुभवा नाहीं आलें । त्याचें शब्दींच राहिलें । फळ मोक्ष झाल्याचें ॥ ४४ ॥ ऐशा ज्ञानालागून । भक्तिपंथीं ना प्राधान्य । ज्ञान हें एक साधन । विश्वास दृढ " व्हाया " असे ॥ ४५ ॥ राजसुखाचें ज्ञान झालें । परि राजेपण नाहीं आलें । मग तें याविण वायां गेलें । आहे पहा सहजचि ॥ ४६ ॥ ऐशी न यावी आपत्ति । कोणयाहि मुमुक्षुवरतीं । म्हणून शांडिल्य सांगती भक्ति । ईश्वरप्राप्तिचें साधन पहा ॥४७॥ म्हणून मोक्षेच्छु जे जे जन । त्यांना भक्ति हेंच साधन । करणें

आहे पहा ग्रहण । श्रीहरीच्या प्राप्तिस्तव ॥ ४८ ॥ जेथें ज्ञानाची नाहीं गति । तेथें एक प्रधान भक्ति । हेंच विचार करितां चित्तीं । आहे कळून येणारें ॥ ४९ ॥ परमात्मवस्तु जगदाधार । व्यापून राहिली चराचर । या तत्त्वांचा विचार । करणें म्हणजेच मोक्षेच्छा ॥ ५० ॥ ती इच्छा ज्याचे जीवीं । झाली त्यानेंच करावी । जिज्ञासा ती पहा बरवी । या सुखमययशा भक्तांची ॥ ५१ ॥ नरजन्मासी येऊन । जो न टाळी जन्ममरण । त्याला द्विपाद पशु अभिधान । हेंच दिलें पाहिजे ॥ ५२ ॥

## सा परानुरक्तिरीश्वरे ॥ २ ॥

ईशाविषयीं अत्यंत प्रीति । तीच होय पराभक्ति । ती केल्यानें ईशप्राप्ति । करणारासी होतसे ॥ ५३ ॥ या सूत्राठायीं जाण । सा परा हे शब्द दोन । लक्ष्यवाचक परिपूर्ण । आहेत कीं ॥ ५४ ॥ अनुरक्ति ईश्वरे । हीं लक्षणवाचक असतीं बा रे । एक सूत्राऱ्या आधारें । लक्ष्यलक्षण कथन केलें ॥ ५५ ॥ भक्ति-माजी भेद दोन । परा आणि अपरा जाण । अपरा जी ती भक्ति गौण । पराभक्ति ती श्रेष्ठ असे ॥५६॥ परा भक्ति करण्या पाहीं । प्रेम पाहिजे ईशाठायीं । प्रेमावांचून होत नाहीं । पराभक्ति विबुध हो ॥ ५७ ॥ प्रेम तें ईश्वराठायीं । बसणें मुळींच अशक्य पाहीं । कां कीं आकारविकार त्याच्या ठाया । गुणावगुण कांहीं नसे ॥ ५८ ॥ म्हणून पराभक्ति करावया । ईश्वर हा मुळींच वायां । जें सांगणें तें करावया । आलें पाहिजे साधका ॥ ५९ ॥ सांगे आत्राशांत बांधा घर । भव्य मोठें सुंदर । तैसाच हा प्रकार । परा भक्ति सांगण्याचा ॥६०॥ भक्ति ती करावया । कांहीं पाहिजे तया ठाया । कांहीं असल्यावांचूनिया । भक्ति ती होणें नसे ॥ ६१ ॥ ऐसी एक शंका । उत्थान पावे एथ देखा । हिचें समाधान ऐका । होणार आहे येणेंरीतीं ॥ ६२ ॥ दृश्य दृष्टिप्राति पडतें । परि तें अदृश्यावरि जगतें । अदृश्याचें अनुमान तें । होतें अस्तित्वें दृश्याच्या ॥६३॥ तो सर्वव्यापी जगदाधार । स्थावर-जंगम-चराचर । व्यापून राहिला साचार । त्या तत्त्वा ईश

म्हणती ॥ ६४ ॥ दृश्य अदृश्या झांकितें । म्हणजे किमपि न उमगूं देतें । बुद्धीस भ्रमीं पाडितें । खरेंखोटें निवडावया ॥ ६५ ॥ दृश्य अवघें नाशिवंत । अदृश्य तें शाश्वत । तें कदा न चळे यत्किंचित् । तें अक्षय अभंग निर्विकल्प ॥ ६६ ॥ त्या अविनाशाच्या ठायीं । प्रेम जडणें हेंच पाहीं । याविण दुजा अर्थ नाहीं । या पराभक्तीचा ॥६७॥ प्रेम ही एक मनोवृत्ति । आहे बुध हो निश्चितीं । शब्द साह्यें न करवे ती । स्पष्ट कवणा कारणें ॥ ६८ ॥ मनासी जें आवडे कांहीं । त्याचें नांव प्रेम पाहीं । ती आवडी ईश्वराठायीं । लागल्या होय भक्ति परा ॥ ६९ ॥ ज्याची लागे आवडी । त्याचें चिंतन घडोघडीं । करी त्यातें मुळीं न सोडी । कर्ता कोणत्याही अवस्थेंत ॥ ७० ॥ पहा अविवेकी पुरुषाचें । मन विषयीं जडतें साचें । विस्मरण ना पडे त्याचें । कोणत्याहि प्रकारें ॥ ७१ ॥ आवडीचे प्रकार । सांगावे तरी कोठवर । ते सांगतां सागराकार । ग्रंथ वाढेल हा माझा ॥ ७२ ॥ कोणा आवडी राज्याची । कोणा आवडी स्वातंत्र्याची । कोणा आवडी विद्वत्तेची । धनमानाची कवणास ॥ ७३ ॥ जें जें आवडे जयासी । तें तें असावें अहर्निशीं । कायमचें आपणापाशीं । ऐसें वाटणें तें प्रेम ॥७४॥ तो पदार्थ आवडता । दुःख होतें दुरावतां । हेंच लक्षण पाहूं जातां । आहे बुध हो प्रेमाचें ॥ ७५ ॥ आतां प्रेम जडण्या पाहीं । ईश वस्तु आहे कीं नाहीं । याचा विचार ये ठायीं । करूं आतां थोडासा ॥ ७६ ॥ साकार आणि निराकार । एक आहे परमेश्वर । प्रत्येक वस्तूसी आधार । आहे ईशतत्त्वाचा ॥७७॥ दृष्टि फेंका देहावरि । तो जड आहे सर्वतोपरि । परि प्राण जेव्हां अंतरीं । शिरला तें तो आला रूपा ॥७८॥ प्राण असल्याचें अनुमान । होतें चलनवलनें करून । देहाच्या त्याचें दर्शन । प्रत्यक्ष झालें नसूनही ॥ ७९ ॥ तैसी जगाची स्थिति । तंतोतंत निश्चितीं । जग कलेवर प्राणाप्रति । आणि प्राण तोचि ईश्वर ॥ ८० ॥ पराभक्ति करण्या जाण । ज्ञान हेंचि साधन । जाणीव ती असल्यावांचून । पराभक्ति घडेना ॥ ८१ ॥ म्हणून ईश्वरी तत्त्वाविषयीं । अत्यंतिक आवडी तीच पाहीं । सर्व बाजूंनीं पहा

होई । पराभक्ति विबुध हो ॥८२॥ ऐशी पराभक्ति करा । जाणून त्या सर्वेश्वरा । तरी साफल्य होईल खरा । जन्म तुमचा विबुध हो ॥ ८३ ॥ प्रल्हाद याच भक्तीनीं । गेला आहे उद्धरोनि । त्यानें भूतमात्राच्या ठिकाणीं । पाहिलें एका ईश्वराला ॥ ८४ ॥

तत्संस्थस्यामृतत्वोपदेशात् ॥ ३ ॥

ब्रह्मनिष्ठ पुरुषांप्रति । मिळणार आहे साच भक्ति मुक्ति । ऐसें या तृतीय सूत्रीं । शांडिल्य मुनि सांगतात ॥ ८५ ॥ ब्रह्मसंस्थ म्हणजे ब्रह्माधीन । ऐसें कित्येक म्हणती जन । परि ब्रह्माधीना-लागून । मोक्ष मिळणें दुर्घट दिसे ॥ ८६ ॥ या जगीं जेवढें । ब्रह्माधीन तेवढें । म्हणून ब्रह्म संस्थ शब्दाकडे । पहावें कोणत्या दृष्टीनें ॥ ८७ ॥ पुण्यात्मा ही ब्रह्माधीन । पातकीही ब्रह्माधीन । ब्रह्मावीण नसे आन । स्थान कोणाही या जगीं ॥ ८८ ॥ म्हणून ब्रह्मसंस्थ शब्दाचा । अर्थ हाचि योग्य साचा । अमृतत्व मिळ-विण्याचा । अधिकार ब्रह्मनिष्ठाचाचि ॥ ८९ ॥ म्हणजे सदाचार संभाळून । पूर्ण श्रद्धा ठेवून । करी ब्रह्मासी अवलोकन । विचाराच्या साह्यानें ॥ ९० ॥ तोच ब्रह्मनिष्ठ होतो । आणि तोच मोक्षा पावतो । इतरासी न घडे तो । मोक्षलाभ केव्हांही ॥९१॥

ज्ञानमितिचेन्न द्विषतोऽपि ज्ञानस्य तदसंस्थितेः ॥ ४ ॥

आतां ब्रह्मसंस्थ शब्दांनीं । जरी घेतला ब्रह्मज्ञानी । तरी त्यालागुनी । मोक्ष मिळणें दुर्घट ॥ ९२ ॥ ज्ञानें त्याची स्थिति कळते । परी प्रेमासी उरतां उरतें । प्रेमावीण कधीं न होते । प्राप्ति इच्छित वस्तूची ॥ ९३ ॥ पहा एखाद्या राजाचें । ज्ञान हेरास परक्याचें । साकल्यें करून असतें साचें । परी प्रेमाचा अभाव ॥ ९४ ॥ तोच त्याचा सेनापती । वा सैनिक निश्चिती । ज्ञान असून प्राण देती । भूपार्थ भूपप्रेमामुळें ॥ ९५ ॥ सेनापती सैनिक रयत । यांचे ठायीं आहे वसत । राजाविषयीं प्रेम अमित । तैशी न स्थिती हेराची ॥ ९६ ॥ म्हणून प्रेमावांचून । फोल आहे ब्रह्मज्ञान । तें सफल व्हावया लागून । आहे अपेक्षा प्रेमाची ॥ ९७ ॥ पहा शब्दज्ञानें नास्तिकाला । उपनिषदाचा

अर्थ कळला । परी त्यासी नाहीं झाला । मोक्षलाभ केव्हांही ॥ ९८ ॥ नास्तिका ज्ञानें ऐसें होतें । गोळी उलटी लागते । भावीक असल्या त्यास करतें । तेंच ज्ञान कृतार्थ॥ ९९ ॥ म्हणून ज्ञानालागून । आहे भक्तीचें प्रयोजन । भक्तियुक्त जें का ज्ञान । त्यासीच मोक्ष रोकडा ॥ १०० ॥ म्हणजे मोक्ष समजा एक खीर । तेथें पय हें ज्ञान साचार । त्यांत भक्तीची साखर । मिळवाल तेव्हां खीर होई ॥ १०१ ॥ त्याच श्रोते पयाठायीं । नास्तिक विष मिसळल्या पाही । ते सुखाऐवजीं प्राण घेई । साच सेवनकर्त्यांचा ॥ १०२ ॥ एवंच लाभ व्हाया कारण । आहे प्रेमाचें प्रयोजन । म्हणून ब्रह्मसंस्थशब्दें करून । भक्तीच घेतली पाहिजे ॥ १०३ ॥ भक्ती आणि प्रेमांत । फरक नाहीं यत्किंचित् । कस्तुरी आणि सुवासवत् । स्थिति प्रेमभक्तीची ॥१०४॥ ब्रह्मसंस्थ म्हणजे ब्रह्मनिष्ठ । ऐसा जो तो भक्तश्रेष्ठ । ऐसें या सूत्रीं कथिलें स्पष्ट । शांडिल्य महर्षीनीं ॥ १०५ ॥

## तयोपक्षयाच्च ॥ ५ ॥

पराभक्ती उत्पन्न । व्हाया खर्चीं पडतें ज्ञान । म्हणून संस्था-शब्दें करून । ज्ञान घेतां नये कीं ॥ १०६ ॥ कां कीं ज्ञानाची आहे ऐशी स्थिती । होणें वस्तूची सर्व माहिती । नुसत्या माहितीनें प्राप्ती । त्या वस्तूची होत नसे ॥ १०७ ॥ ज्ञानें वस्तूचें मोठेपण । येणार आहे कळून । परी समरस व्हाया लागून । आहे प्रेमाची अपेक्षा ॥ १०८ ॥ मोठेपणा जेव्हां कळतो । तेव्हां भाव उत्पन्न होतो । तोच भाव समरस करतो । अनन्यतेनें वस्तूशीं ॥ १०९ ॥

## द्वेषप्रतिपक्षभावाद्रसशब्दाच्च रागः ॥ ६ ॥

आतां पहा शब्द भक्ती । हा द्वेषाचा प्रतियोगी निश्चिती । रसशब्दें सांगे श्रुती । भक्तीचेंच रहस्य ॥ ११० ॥ रस अनुराग भक्ती । हे पर्यायशब्द निश्चिती । या तिन्ही शब्दांपासूनि घेती । प्रेम हाच अर्थ ज्ञाते ॥ १११ ॥ प्रकाशनाशीं अंधार । सुखदुः-खाचा परिहार । करितसे साचार । कां कीं ते प्रतियोगी

तयाचे ॥ ११२ ॥ प्रेम हें द्वेषाचें । आहे प्रतियोगी साचें । प्रेममय झाल्या मानवाचें । मग द्वेष संपला ॥ ११३ ॥ द्वेष द्वैतावांचून । न होय कीं उत्पन्न । आणि द्वैत जेथें निर्माण । तेथें न प्राप्ती ब्रह्माची ॥ ११४ ॥ हें द्वैतभक्तीचें । आहे अलौकिक साचें । सेव्य-सेवकपणाचें । नातें टिकवण्या उपयोगी ॥ ११५ ॥ नातें एकदां जडल्यावरी । प्रेम द्वैत दूर करी । तें द्वैत झाल्या दूरी । समरसता प्राप्त होते ॥ ११६ ॥ कामिनी आणि कांत । हें नात जडवी द्वैत । आणि परस्परांचें करवित । प्रेम ऐक्य दोघांचें ॥ ११७ ॥ ऐक्यें दांपत्यपणा आला । द्वैतभाव मावळला । जिनगीपुरता लाधला । अधिकार सारखा दोघांसी ॥ ११८ ॥ तेंवी सेव्य आणि सेवक । हें नातें राहून देख । भक्त भगवंत होणें एक । आहे भगवत्प्रेमानें ॥ ११९ ॥ सर्वव्यापी सर्वेश्वर । हें एकदां समजल्यावर । सद्भक्त हा करणार । द्वेष तरी कवणाचा ॥ १२० ॥ उपास्य माझें माझ्यासहित । हें अबाढव्य जगतांत । भरलें आहे ओत-प्रोत । हें कळतां तो मुक्तचि ॥ १२१ ॥ म्हणजे प्रेमही कायम राहिलें । द्वैत उपजून लया गेलें । निखळ अद्वैत उरलें । या भक्तीच्या सेवनें ॥ १२२ ॥

## न क्रिया कृत्यनपेक्षणाज्ज्ञानवत् ॥ ७ ॥

ज्ञानाप्रमाणें पराभक्ती । ना क्रियात्मक निश्चिती । ज्या क्रियेनें साध्य होती । त्या गौणी भक्ती श्रोते हो ॥ १२३ ॥ पहा ज्ञान-सामुग्रीसमोर । असतां ज्ञान होतें साचार । तेथें क्रिया करण्याचा प्रकार । उरत नसे ॥ १२४ ॥ सूर्य पाहतां सूर्याचें । ज्ञान तें होतें साचें । तें ज्ञान व्हाया क्रियेचें । नाहीं मुळीं प्रयोजन ॥ १२५ ॥ तैसीच ही भक्ती परा । क्रियारहित ध्यानीं धरा । त्याच भक्तीनें मोक्ष खरा । होणार आहे विबुध हो ॥ १२६ ॥

## अत एव फलानन्त्यम् ॥ ८ ॥

अत एव म्हणजे ज्या अर्थी । ही क्रियात्मक ना परा भक्ती । त्या अर्थी फल निश्चिती । आहे तिचें अविनाश ॥ १२७ ॥ ज्या साध्य होती क्रियेनें । नाश आहे त्या कारणें । हेंच मुनि शांडि-

ल्यानें । कथन केलें या सूत्रीं ॥ १२८ ॥ आतां भक्ती हा शब्द जाण । पहा मानूनिया गौण । त्या शब्दाचा अर्थ ज्ञान । केल्या न ठीक होईल कीं ॥ १२९ ॥ त्याचसाठीं नववें सूत्र । केलें आहे पहा ग्रथित । या शतसूत्री मालेंत । सूत्रकारानें पहा तें ॥ १३० ॥

तद्वतः प्रपत्तिशब्दाच्च न ज्ञानमितरप्रपत्तिवत् ॥ ९ ॥

आतां ज्ञानीयानें भली । पाहिजे कीं भक्ती केली । तरीच सफलता झाली । झालेलिया ज्ञानाची ॥ १३१ ॥ पहा श्रोते यावरून । भक्ती म्हणजे नोहे ज्ञान । भक्ती ज्ञानाचें कार्य पूर्ण । आहे कीं विबुध हो ॥१३२॥ चराचरासी व्यापक । जो सच्चिदानंद एक । ज्याच्यावांचुन आणीक । जगीं न कांहीं जगासह ॥ १३३ ॥ ऐशा सच्चिदानंदाठायीं । प्रेम वाढणें ती भक्ती पाही । आणि प्रेमावीण होणें नाहीं । त्या तत्त्वासी समरस ॥ १३४ ॥ मन निष्काम झाल्याविना । पराभक्ती होइना । आणि ती बुधहो केल्याविना । ब्रह्मनिष्ठा न वाढत ॥ १३५ ॥

सा मुख्येतरापेक्षितत्वात् ॥१०॥

ऐशी ही पराभक्ती । जी निश्चयें आत्मरती । ज्ञान योग हीं असतीं । या पराभक्तीचीं अंगें पहा ॥ १३६ ॥ म्हणजे ज्ञानाहून योगाहून । ही पराभक्ती श्रेष्ठ जाण । ऐसें इचें प्रधान लक्षण । सूत्रकारें कथन केलें ॥ १३७ ॥ प्रधान म्हणावें तियेसी । साक्षात संबंध क्रियेसी । ज्याचा आहे निश्चयेसी । तें तत्त्व प्रधान होय ॥ १३८ ॥ म्हणजे ज्ञान आणि योगांत । पराभक्ती प्रधान सत्य । ज्ञान आणि योगाप्रत । अंगें तियेचीं म्हणावीं ॥ १३९ ॥ म्हणजे अंगीं होय पराभक्ती । ज्ञानयोग अंगें निश्चितीं । हेंच येथें सांगती । शांडिल्यमुनी साधकातें ॥ १४० ॥

प्रकरणाच्च ॥ ११ ॥

हें पराभक्तीचें । प्रकरण आहे साचें । म्हणजे आत्मरतीचें । समजावें विबुध हो ॥ १४१ ॥ छांदोग्य उपनिषदांत । या पराभक्तीप्रत । आत्मरती नाम सत्य । दिधलें आहे साजिरें ॥ १४२ ॥

तैसें आत्मक्रीड आत्ममिथुन। ऐसीं नांवें आणखी दोन। या पराभक्तीकारण। दिधलीं गेलीं आहेत कीं ॥ १४३ ॥ म्हणजे सबाह्य अभ्यंतरीं। आत्मवस्तु भरली खरी। ऐसें जाणूनि अत्यादरीं। अनन्य जो होय तेथ ॥ १४४ ॥ एकदां ऐसें मानल्यावर। अवघेंच कांहीं झालें दूर। तो आत्म्याठायीं निरंतर। अनन्यप्रेमें होतसे ॥१४५॥ ऐसा जो तो आत्मरती। म्हणजे आत्म्याठायींच ज्याची प्रीती। त्याला मिळे भोगण्याप्रती। आत्मानंद तो पहा ॥ १४६ ॥ आत्मानंदाची पायरी। आहे अगदीं वरची खरी। तो आनंद येतो करीं। या पराभक्तियोगानें ॥ १४७ ॥ म्हणून येथें अभिधान। दीधलें या सूत्रालागून। नुसतें पहा प्रकर्ण। कांहीं न यापलीकडे ॥ १४८ ॥

## दर्शनफलमितिचेन्न तेन व्यवधानात् ॥ १२ ॥

आतां फल हें ज्ञानाचें। ऐसें जरी म्हणाल वाचे। तरी तें उपयोगाचें। मुळींच नाहीं विबुध हो ॥१४९॥ आत्मरतीकारण। होण्याचें तें व्यवधान। न राहिलें प्रयोजन। कां कीं मुळींच मुख्य ती ॥ १५० ॥

## दृष्टत्वाच्च ॥ १३ ॥

पहा लोकव्यवहारीं। प्रीति उत्पन्न होण्या खरी। प्रयोजन आहे सर्वतोपरी। पदार्थाच्या ज्ञानाचें ॥ १५१ ॥ आंबा आणि साखर। हे पदार्थ मधुर। ऐसें तें कळल्यावर। प्रेम उपजे त्यांचे· विषयीं ॥१५२॥ म्हणून ही पराभक्ती। साच आहे कोण्या रितीं। हें कळल्यावांचून निश्चितीं। प्रेम मुळीं उपजेना ॥ १५३ ॥ पराशब्देंकरून। सच्चिदानंद घेणें जाण। त्याचे ठायीं लावणें मन। याचें नांव पराभक्ती ॥ १५४ ॥ म्हणून ब्रह्माचे अवघे गुण। ज्ञानें कळल्यावांचून। प्रेमभरित होणें मन। नाहीं त्या ब्रह्माविषयीं ॥ १५५ ॥ आत्मा हा शुद्ध बुद्ध। आत्मा हा सच्चिदानंद। आत्मा हाच कैवल्यकंद। मुक्त सर्वसंपन्न तो ॥ १५६ ॥ ऐसें जेव्हां कळोन येतें। तेव्हांच प्रीती उपजते। सिद्ध होतो अनुसरण्यातें। ती सुखदा पराभक्ती ॥ १५७ ॥ अपरा म्हणजे प्रकृती। ती जगा-

कारण निश्चितीं । परी तिचे गुण असतीं । अगदीं उलट आत्म्याच्या ॥ १५८ ॥ म्हणून प्रकृती अनर्थकारी । नाशवंत आहे खरी । भवामाजीं गोंवणारी । कर्मी दर्जाची अशुद्ध ॥ १५९ ॥ ऐसे प्रकृतीचे दोष कळतां । कोण हपापे तिच्याकारितां । डबक्या-प्रती पाहतां । हंस न होय आनंदित ॥ १६० ॥ म्हणून मनाचें मालिन्य । ज्ञानें दूर करून । आदरें करावें ग्रहण । या परा-भक्तीचें ॥ १६१ ॥

## अत एव तद्‌भावाद्बल्लवीनां ॥ १४ ॥

म्हणून हो श्रोते ज्ञान । मोक्षाचें ना स्वतंत्र साधन । मात्र भक्तीद्वारा कल्याण । होणार याच ज्ञानानें ॥ १६२ ॥ परी ज्ञान नसलें जरी । पराभक्ति फलद खरी । होते जयाच्या अंतरीं । ही उपजली असे ॥ १६३ ॥ पहा पहा यमुनातीरीं । गोपिका-गोप-सुंदरी । पराभक्ती पावून खरी । कृष्णकृपेनें मुक्त झाल्या ॥ १६४ ॥ आतां येथें गोपींप्रत । ज्ञान कृष्णाचें यत्किंचित । प्रथमतः नव्हतें सत्य । तें अनुभवें प्राप्त झालें ॥ १६५ ॥ बारा गांव अग्नि गिळिला । हा प्रकार जेव्हां पाहिला । तेव्हां तो त्यां कळोन आला । हा ईश्वर म्हणोनी ॥ १६६ ॥ अमानुष कृत्यें कृष्णाचीं । जेव्हां त्यांनीं पाहिलीं साचीं । तेव्हांच त्यांना ईश्वर-त्वाची । झाली त्याच्या कल्पना ॥ १६७ ॥ अघटित कृत्यें प्रेम जडलें । तें ध्यासानें दुणावलें । प्रत्येक वस्तूंत पाहिलें । त्यांनीं भगवान कृष्णाला ॥ १६८ ॥ झाडांतून निघाला । जलातळीं उत्पन्न झाला । फळामाजीं सांपडला । तें फोडून पाहतां त्यां ॥ १६९ ॥ याचें स्पष्ट उदाहरण । रासक्रीडेवरून । येणार आहे कळून । पहा विचारें मनातें ॥ १७० ॥ गोपी होत्या अगणित । एक होता नंदसुत । प्रत्येकीच्या मनांत । आपण त्यासींच खेळावें ॥१७१॥ आणि तैशा त्या खेळल्या । एकमेकींस विचारूं लागल्या । तूं फुगड्या सांग केल्या । कोणासवें गे कुंजवनीं ॥ १७२ ॥ मी जो एकदां कृष्ण धरिला । तो अखेरपर्यंत ना सोडिला । तें ऐकून दुसरीला । हसूं लोटलें अनिवार ॥ १७३ ॥

तीं म्हणे हें असत्य । कृष्ण माझ्या हातांत । होता शेवटपर्यंत । तो तुझ्या हातीं कसा आला ॥ १७४ ॥ ऐशा वाद बल्लवींचा । विचारविनिमय झाला साचा । निष्कर्ष या गोष्टीचा । ऐसा त्यांनीं काढिला मग ॥ १७५ ॥ नका त्या म्हणूं नंदसुत । तो आहे अनंत । याचा अनुभव आपणाप्रत । कितीदां तरी आला असे ॥१७६॥ हें जें त्यांना झालें । तें प्रेमानें उत्पन्न केलें । म्हणून ज्ञान गौण ठरलें । प्रेमापेक्षां सहजचि ॥ १७७ ॥ प्रेम म्हणजेच भक्ती । हरिविण नाहीं इच्छा चित्तीं । म्हणून परा स्वरूपा ती । आली भक्ती गोपींची ॥ १७८ ॥

भक्त्या जानातीति चेन्नाभिज्ञप्त्या साहाय्यात् ॥ १५ ॥

केल्या भक्तीचें सेवन । माझें होतसे ज्ञान । परी हें नाहीं खरें जाण । येथें स्मरण अवश्य असे ॥ १७९ ॥ गुण आधीं कळल्या-विना । प्रेम उत्पन्न होईना । ऐसें तेरावे सूत्रीं जाणा । कथिलें शांडिल्य मुनीनें ॥ १८० ॥ आणि तेंच या पंधराव्यांत । कां कथिते झाले सत्य । या सांगण्याचा हेत । ऐसा असे पहा तो ॥ १८१ ॥ ज्ञानें प्रेम उपजलें । तें स्मरणावीण न टिके भलें । हें या सूत्रीं सुचविलें । विशेष प्रकारें तयानें ॥ १८२ ॥ म्हणजे ज्ञानें प्रेम उपजलेलें । स्मरणें पाहिजे दृढ केलें । जोंवरी नाहीं आलें । मोक्षफळ हातासी ॥ १८३ ॥ ज्ञान प्रेमातें उपजवी । स्मरण त्यासी अढळ करवी । आणि तेंच प्रेम पोंचवी । अविनाश मोक्षपदा ॥ १८४ ॥

प्रागुक्तं च ॥ १६ ॥

हें पूर्वींच सांगितलें । ज्यां ब्रह्मात्मैक्यज्ञान झालें । ते परा-भक्ती पावले । मोक्षाप्रती साधावया ॥ १८५ ॥

" एतेन विकल्पोऽपि प्रत्युक्तः ॥ १७ ॥ "

ज्ञान भक्तीचें आहे अंग । अंगीं ती पराभक्ती चांग । हा प्रति-पादनाचा भाग । मागील सूत्रीं कथन केला ॥ १८६ ॥ म्हणून या दोन्ही तत्त्वांत । विकल्प ना संभवत । वा समुच्चयही यात्कांचित । होत नसे विबुध हो ॥ १८७ ॥ विकल्प व्हाया कारण । समबल

लागतें साधन । येथें पाहूं गेल्या ज्ञान । अंग आहे भक्तीचें ॥ १८८ ॥ म्हणून ज्ञान आणि भक्ती । हीं समबल ना निश्चितीं । आतां समुच्चयाची स्थिती । येणें रिती आहे पहा ॥ १८९ ॥ सिद्धि कृत कार्याची । पहा श्रोते व्हावया साची । अपेक्षा आहे अवघ्यांची । एकही नये वगाळितां ॥१९०॥ पहा शेतीच्या कार्यातें । अवघींच लागती आउतें । एक नसल्या हरकत होते । त्या शेतीच्या कार्याची ॥ १९१ ॥ नांगर कुळव आणि पाभर । मोट नाडा बैल विहीर । खुरपें विळा माळ्यावर । बसतां गोफण पाहिजे ॥ १९२ ॥ हीं सर्व एके ठायीं । करी तेव्हां शेती होई । धर्म समान एकाचाही । नाहीं पहा आतांत ॥ १९३ ॥ स्थिती राष्ट्रोद्धाराची । औतापरीच आहे साची । एकी सर्व जातींची । होणें आहे अवश्य ॥ १९४ ॥ म्हणजे समुच्चयाकारण । आहे अवघ्याचें प्रयोजन । परी जे असती समसमान । समुच्चय तेथें तो नको ॥ १९५ ॥ पहा मूषक एक मरून पडला । तो लाखों मुंग्यांनीं ओढीत नेला । तोच बिडालें गट्ट केला । एकट्यानें येऊन ॥ १९६ ॥ म्हणून ईश्वराची व्हाया प्राप्ती । मुख्य एक पराभक्ती । पृथक् पृथक् न कामा येती । ज्ञानयोगकर्मादिक॥१९७॥

“ ॥ देवभक्तिरितरस्मिन् साहचर्यात् ॥१८॥ ”

देवावरी वा गुरुवरी । जो निरतिशय प्रेम करी । श्रद्धा ठेवून सर्वतोपरी । त्याला फळतील उपनिषदें ॥ १९८ ॥ म्हणजे उपनिषदांतील तत्त्वज्ञान । फलद्रूप व्हाया कारण । या पराभक्तीचें प्रयोजन । अवश्य आहे ॥ १९९ ॥ ऐशी ती पराभक्ती । अपराभक्तीनेंच येती । पहा पूर्णदशेप्रती । दोष सगळे जाऊन ॥ २०० ॥ पहा जी कां कुमारी । तीच तरुणी होय खरी । आणि तरुणी तीच म्हातारी । अवस्था मात्र भिन्न ॥ २०१ ॥ तोच प्रकार आहे येथ । परा अपराभक्तींत । उपनिषदाचे सिद्धांत । येती अनुभवा भक्तीनें ॥ २०२ ॥ आतां देव शब्द सूत्रांत । केला आहे ग्रथित । त्या देवशब्दाचा अर्थ । येणें रिती करावा ॥२०३॥ जो दिवीं वास करी । तो देव निर्धारीं । ब्रह्मा विष्णु मन्मथारी ।

वा वरुण इंद्र पूषा ॥ २०४ ॥ वा मोक्षदाता गुरुवर । जो कां असेल साचार । तोही देव निर्धार । करून मनाचा मानणें ॥ २०५ ॥ भक्ती देवादिकांची । आहे अपरा स्वरूपाची । तीच निष्काम केल्या साची । पराभक्ती होत असे ॥ २०६ ॥ येथें देवशब्दें करून । घेतल्या निर्गुण निरंजन । ज्याचा ठावठिकाण । मुळीं कळेना आरंभीं ॥ २०७ ॥ गुण ठाव ठिकाण । हें कळल्या-वांचून । प्रेमयुक्त ना होई मन । केव्हांही त्या वस्तूविषयीं ॥२०८॥ म्हणून देवशब्दें करूनी । गुरु विष्णु वा शूलपाणी । यांतून पटेल तो घेऊनी । अपराभक्तिस आरंभ करा ॥ २०९ ॥

॥ योगस्तूभयार्थमपेक्षणात् प्रयाजवत् ॥ १९ ॥

योगाचें तें प्रयोजन । आहे ज्ञानाकारण । तैसेंच भक्तीलागून। वाजपेयासी प्रयाज जसें ॥ २१० ॥ योगसाधनावांचून । शुद्ध न होई अंतःकरण । आणि शुद्ध झालियावांचून । स्थिरता त्यासी येईना ॥ २११ ॥ मन जेव्हां स्थिर होतें । तेव्हां ज्ञान प्रगटतें । आणि ऐसें ज्ञान साधन होतें । हरीचिया भक्तीसी ॥ २१२ ॥ ऐसें गीताशास्त्रांत । बोलला आहे भगवंत । पंधराविया श्लोकांत । पहा षष्ठाध्यायाच्या ॥ २१३ ॥ आतां म्हणतील ऐसें कोणी । योग आणि ज्ञान दोन्ही । हीं अंगें भक्तीलागुनी । जरी साक्षात आहेत ॥ २१४ ॥ मग ते दोघे समबल झाले । योग आणि ज्ञान भले । म्हणून कारण नाहीं उरलें । योगा ज्ञानाचें अंग होणें ॥ ॥ २१५ ॥ समबल जे असतात । ते ना अंग होतात । परी वाज-पेय नाम यज्ञांत । प्रयाज दोहींचें अंग झालें ॥ २१६ ॥ त्या वाजपेय यज्ञाची । दीक्षणीयेष्टी अंग साची । त्या दोहींला प्रयाजाची । आहे मुळीं अपेक्षा ॥ २१७ ॥ तैसें हें योगसाधन । ज्ञानाचेंही अंग असून । भक्तीलाही प्रयोजन । आहे या योगाचें ॥२१८॥ आतां कित्येक ठिकाणीं । भक्ती योगाचें अंग म्हणोनी । बोलिले पातंजलमुनी । आपल्या योगदर्शनांत ॥ २१९ ॥ आणि शांडिल्य ऐसें सांगतात । योगभक्तीचें अंग सत्य । याच्या उलगड्याप्रीत्यर्थ । सूत्र पुढील विसावें ॥ २२० ॥

## ॥ गौण्या तु समाधिसिद्धिः ॥ २० ॥

अपराभक्ती ती गौणी । तिच्या श्रोते सेवनांनीं । समाधी जाते लागुनी । म्हणून ती योगाचें अंग होय ॥ २२१ ॥ समाधीतें साधावया । योगशास्त्राचिये ठाया । ज्या कथिल्या आहेत क्रिया । योगशास्त्रकारांनीं ॥ २२२ ॥ त्या अवघ्या करून । योगी समाधी लावी पूर्ण । तेंच कार्य होय जाण । भजनपूजन चिंतनें ॥ २२३ ॥ म्हणजे योगाक्रिया करून । स्थिर करणें आहे मन । तेंच एखाद्या लागून । भजनानें साधितां येईल ॥ २२४ ॥ म्हणजे योगाच्या साधनापरी । ही गौणी भक्ती आहे खरी । म्हणून पतंजलवैखरी । भक्तियोगाचें अंग म्हणे ॥ २२५ ॥ म्हणजे योग-क्रियेसमान । ही क्रियात्मक भक्ती गौण । परा भक्ती लागून । ही नसे बाधक ॥ २२६ ॥

## ॥ हेया रागत्वादिति चेन्नोत्तमास्पदत्वात् संगवत् ॥ २१ ॥

अनुरागरूप आहे भक्ती । म्हणून ती त्याज्य निश्चिती । अशा भक्तीनें मोक्षप्राप्ती । होणार नाहीं केव्हांही ॥ २२७ ॥ ऐसें कोणी म्हणतील जरी । तें न खरें सर्वतोपरी । ज्या प्रीतीचा विषय हरी । असेल ती सत्यचि ॥ २२८ ॥ विषयादिकांची प्रीती देख । आहे सर्वदा बंधजनक । भक्ती हरीची अमोलिक । जेथें लेश न बंधाचा ॥ २२९ ॥ पहा श्रोते व्यवहारांत । असत्संग निंद्य ठरत । परी सत्संगतीप्रत । तैसें न कोणी मानीत ॥ २३० ॥ सत्संगानें उत्तम गती । मिळे होय हरीची प्राप्ती । सत्संगाला अधोगती । स्वप्नींही न दृष्टी पडे ॥ २३१ ॥ असत्संगतीचा प्रकार । याच्या उलट साचार । हरिभक्तीचा व्यवहार । अगदींच आहे निराळा ॥ २३२ ॥ ती जरी सकाम असली । तत्त्व-विचारीं निंद्य ठरली । विचाराची असल्या भली । जोड त्या सकाम भक्तीला ॥ २३३ ॥ तीच होईल निष्काम । परा हें पावेल नाम । देईल मोक्षाचें मोक्षधाम । अक्षयींच रहावया ॥ २३४ ॥ म्हणजे अपराभक्तीच परा होते । पहा तुम्ही सरितेतें । ती जेथें उगम पावते । तेथें असते लहानचि ॥ २३५ ॥ तिचाच प्रवाह

पुढत पुढती । थोर होतो निश्चितीं । बोटी तारवें चालती । त्याच नदीच्या प्रवाहांत ॥ २३६ ॥ श्रोते ही सकाम भक्ती । जरी नसली मोक्षदाती । तरी आहे ही वाढविती । अचळ धर्मश्रद्धेला ॥ २३७ ॥ धर्मश्रद्धा बळावल्यास । शुद्ध होतें मानस । तें झाल्या विषयदोष । कळूं लागती त्याचे त्या ॥ २३८ ॥ मग स्वार्थत्याग बळावतो । विषयसंगाचा वीट येतो । मग निष्काम सहज होतो । प्रीती राहून हरीची ॥ २३९ ॥ तीच प्रीती परा होते । आत्मरती तया करिते । ऐसें या सूत्रातें । शांडिल्य मुनी सांगती ॥ २४० ॥

तदेव कर्मिज्ञानियोगिभ्य आधिक्यशब्दात् ॥ २२ ॥

परा भक्ती श्रेष्ठ जाण । या कर्मज्ञानयोगाहून । राजयोग तोही गौण । आहे निःसंशय इच्यापुढें ॥ २४१ ॥

प्रश्ननिरूपणाभ्यामाधिक्यसिद्धेः ॥ २३ ॥

आतां येथपर्यंत । सूत्रविवेचनावरून सत्य । ईश्वरप्राप्तीच्या साधनांत । सुखद पंथ भक्तीचा ॥ २४२ ॥ हेंच आहे सिद्ध झालें । तेंच भगवंतानें कथन केलें । गीताशास्त्रामाजी भलें । धर्मानुज अर्जुनाला ॥ २४३ ॥ म्हणजे अवघ्या साधनाभीतरीं । परा भक्तीच श्रेष्ठ खरी । एक्याही साधना तिची सरी । येणार नाहीं विबुध हो ॥२४४॥ गंधामाजी कस्तुरी । पर्वतामाजी हिमगिरी । किंवा देवांत त्रिपुरारी । वा सरितेमाजी जन्हु तनया ॥ २४५ ॥ तीर्थामाजी गोदावरी । वा क्षेत्रामाजी पंढरी । तेवीं अवघ्या साधनाभीतरीं । श्रेष्ठ पंथ भक्तीचा ॥ २४६ ॥

नैव श्रद्धा साधारण्यात् ॥ २४ ॥

श्रद्धा म्हणजे नोहे भक्ती । ती सर्व साधारण निश्चिती । कोणतेंही कृत्य करण्याप्रती । मूळांत श्रद्धा लागते ॥ २४७ ॥ मुख्यांग भक्तीचें । श्रद्धा हेंच होय साचें । कोणतेंही न व्हावयाचें । काम नुसत्या श्रद्धेनें ॥ २४८ ॥ आधीं व्हावें लागे ज्ञान । त्यापुढें श्रद्धा जाण । त्यानंतर प्रयोजन । आहे आत्यंतिक प्रेमाचें ॥२४९॥ तेव्हांच कृत्य सांग होतें । आणि त्याला इच्छित फळ येतें । हेंच

या सूत्रानें । शांडिल्यमुनी सांगतात ॥ २५० ॥ म्हणजे श्रद्धच्या ठिकाणीं । ज्ञान पाहिजे पूर्णपणीं । मात्र तीं प्रेमावांचूनी । मुळीं असतां कामा नये ॥ २५१ ॥ श्रद्धा प्रेमरूप व्हावया । कराव्या लागती कांहीं क्रिया । त्या केल्या वांचूनिया । प्रेमस्वरूपा न येइ-ती ॥ २५२ ॥ पहा ज्ञानावांचून । जी श्रद्धा असे जाण । त्या श्रद्धेस अभिधान । अश्रद्धा हेंच असे ॥ २५३ ॥ जी श्रद्धा प्रेम-रहित । ती अंधश्रद्धा साक्षात । या दोहींची एक जात । इच्छित फळ त्यांला नसे ॥ २५४ ॥ अश्रद्धेनें काम नासतें । अंधश्रद्धेनें विपरीत होतें । सुश्रद्धा मात्र नेते । इच्छितशा मुक्कामा ॥ २५५ ॥ पहा देशीं आपुल्या सांप्रत । राष्ट्रोद्धारास आला ऊत । परी तो सुश्रद्धाविरहीत । म्हणून फल येईना ॥ २५६ ॥ या आधुनिक राष्ट्रभक्तांठायीं । नुसती श्रद्धा आहे पाहीं । ती ही न शुद्ध कायम राही । ती अश्रद्धा होतसे ॥ २५७ ॥ म्हणून फळ येइना । राष्ट्रोद्धार होइना । उलट नाना यातना । राष्ट्र भोगूं लागलें ॥ २५८ ॥ अवघ्या राष्ट्रभक्तांची । श्रद्धा ज्ञानावीण साची । प्रेत-रूप देहाची । सांगा काय किंमत ॥ २५९ ॥ हें राष्ट्रश्रद्धेचें अभ्र आलें । व्योमीं विचरूं लागलें । परी तें निर्जल आहे भलें । कांहीं न उपयोग तयाचा ॥ २६० ॥ त्याचा उपयोग इतका झाला । सुखलेश सूर्य मंदावला । दुःखरूप सांथी महीतला । झाल्या मात्र निर्माण ॥ २६१ ॥ म्हणजे श्रद्धेनें राष्ट्रोद्धार । करूं गेले साचार । त्या श्रद्धेचें रूपांतर । झालें अंधश्रद्धेंत ॥ २६२ ॥ अंधश्रद्धा ऐसें करिते । मतमतांतरें माजविते । समाजपटाला फाडिते । चिंध्या त्याच्या करावया ॥ २६३ ॥ सुश्रद्धेच्या ठायीं जाण । असावें लागतें पूर्ण ज्ञान । आणि तेंच सोडितें नेऊन । प्रेमाचिया कल्लोळीं ॥ २६४ ॥ म्हणजे ज्ञान श्रद्धा प्रेम पाही । जेव्हां एके ठिकाणीं होई । त्या एकीरूप वृक्षा येई । अमोघ फल मोक्षाचें ॥ २६५ ॥

## तस्यांतत्वे चानवस्थानात् ॥ २५ ॥

आतां श्रद्धेलागून । भक्ती ऐसें मानिल्या जाण । अनवस्था प्रसंग पूर्ण । येणार आहे विबुध हो ॥ २६६ ॥ श्रद्धा एक मनोवृत्ती । निराळें स्वरूप ना तिजप्रती । ती कधीं कायम राहती । कधीं नाहिंशी होतसे ॥ २६७ ॥ जी अधोपरी उत्पन्न होते । ती सवेंच विलया जाते । जिला ज्ञान उत्पन्न करितें । तीच टिकते कांहीं काळ ॥ २६८ ॥ ऐशा त्या श्रद्धेस । प्रेमाची जोड मिळाल्यास । ती भक्तीचिया स्वरूपास । येवोनियां बैसते ॥ २६९ ॥ श्रद्धा हें भक्तीचें । प्रथमांग आहे साचें । या न्यायें तयाचें । रहस्य शोधूं गेल्यास ॥ २७० ॥ श्रद्धेलाहीं पूर्वांग । कांहीं तरी पाहिजे चांग । ऐशा श्रद्धा अलग अलग । मानिल्या पाहिजेत किती तरी ॥२७१॥ पहा प्रत्येक कर्मारंभाला । आरंभ आचमनापासून भला । त्या आचमनकर्माला । कांहीं आधीं पाहिजे मग ॥२७२॥ परी ऐसें कोठेंच नाहीं । आचमनें कर्मारंभ होई । परी आचमन हें कर्म नाहीं । त्याचा प्रकार निराळा ॥२७३॥ यापरी श्रद्धेचें नातें ।भक्तीसी आहे साचें । प्रकार या श्रद्धेचे । गतसूत्रीं कथियेले ॥ ॥ २७४ ॥ गीतेच्या सहाव्या अध्यायांत । सत्तेचाळीसाव्या श्लोकांत । कथिलें आहे उत्तरार्धांत । भगवंतानें येणें रिती ॥ ॥ २७५ ॥ श्रद्धा उत्पन्न झालेला । जो कोणी भजतो मला । तो युक्ततमपदाला । पावतसे निश्चित ॥ २७६ ॥ असो श्रद्धा आणि भक्ती । ह्या दोन्हींही मनोवृत्ती । फरक त्यांत कोणत्या रिती हें मागें कथन केलें ॥ २७७ ॥

## ब्रह्मकाण्डं तु भक्तौ तस्यानुज्ञानाय सामान्यात् ॥ २६ ॥

शिरोभाग वेदाचा । जो कां उपनिषद् समूह साचा । त्या अवघ्या उपनिषदांचा माथितार्थ ऐसा असे ॥ २७८ ॥ या उपनिषदानें भलें । ईश्वरी सामर्थ्य वर्णिलें । आणि ऐश्वर्याला वाखाणिलें । ईश्वरी तत्त्व कळण्यास ॥ २७९ ॥ तें कळण्याचें जें साधन । त्याचेंच नांव आहे ज्ञान । परी हें नुसतें ज्ञान । नाहीं खचित मोक्षदायी ॥ २८० ॥ म्हणून ज्ञानांगी जी भक्ती । तीच

आहे मोक्षदात्री । ज्ञानाला न कोणी म्हणती । तें जाणावें म्हणून ॥ २८१ ॥ जाणावें लागतें ब्रह्माला । ज्ञानाचिया घेऊन बला । तोच पराभक्तीस गेला । आहे एक निःसंशय ॥२८२॥ आतां पहा येथवरी । सूत्रें सव्वीस झालीं खरीं । प्रथमच्या नवांभीतरीं । कथिलें रूप परेचें ॥ २८३ ॥ आणि या सत्रा सूत्रांत । साधनें केलीं ग्रथित । त्या साधनांचा मनांत । विचार करणें प्रत्येकीं ॥ २८४ ॥ त्या साधनांचें विशेष लक्षण । द्वितीयाध्यायीं होईल कथन । सत्ताविसाव्यापासून । तें आतां अवधारा ॥ २८५ ॥

॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥

( प्रथमाध्याय समाप्त. )

जय श्रीकृष्ण.

# अध्याय दुसरा.

## ॐ बुद्धिहेतुप्रवृत्तिराविशुद्धेरवघातवत् ॥ २७ ॥

ही विमल मोक्षद सुखकारी । पराभक्ती साजिरी । जोंवरी न आली करीं । तोंवरी ज्ञाना सेवणें ॥ २८६ ॥ म्हणजे पराभक्तीचें । जें हेतुभूत ज्ञान साचें । सेवन तया ज्ञानाचें । करणें आहे आवश्य ॥ २८७ ॥ जैसे गा ते तण्डुल । जोंवरी न झाले उज्ज्वल । कांडणें आहे तात्वकाल । मुसळ घेऊन तयांसी ॥२८८॥ तांदुळाचा शुद्धपणा । जोंवरी न दिसला नयनां । तोंवरी त्याच्या कांडणा । करणें आहे आवर्जून ॥ २८९ ॥ तीच आहे येथें स्थिति । ज्ञानभक्तीची निश्चिती । आवश्यकता ज्ञानाची ती । पराभक्तीस सर्वकाळ ॥ २९० ॥ जैसें प्रकाशाचें साधन । दीपज्योत आहे जाण । त्या ज्योतीचें असणेंपण । प्रकाश टिकण्या अवश्य असे ॥२९१॥ प्रत्येक क्षणक्षणाला । दीप ज्योती निर्मितो भला । म्हणून स्थिरत्व प्रकाशाला । येतें झालें साच कीं ॥ २९२ ॥ तैसेंच होतें येथ । अक्षय टिकवणें ज्ञानज्योत । तरी पराभक्ती जी प्रकाशवंत । तिचें टिकणें होईल कीं ॥ २९३ ॥

## तदङ्गानां च ॥ २८ ॥

तेंवी उपांगें ज्ञानाचीं । सेव्य सर्वदा आहेत साचीं । जेंवी तेलवातीचीं । आवश्यकता ज्योतीतें ॥ २९४ ॥ उपांगांवांचून । स्वरूपासी नये ज्ञान । जेंवी देहालागून । अवयवांची अपेक्षा ॥ २९५ ॥ ज्ञान या शब्दांत । अंतर्भाव आहे होत । उपांगांचा क्रियेसहीत । हें येथें विसरूं नका ॥ २९६ ॥ पहा राज्य रक्षणाप्रती । अवश्य आहे सेनापती । ती एक ठेविल्या व्यक्ती । राष्ट्रसंरक्षण होइना ॥ २९७ ॥ सेनापती या हुद्यांत । सेनेचा अंतर्भाव होत । त्याच्या सामानासहित । पहा विचार करूनी ॥ २९८ ॥ शिपाई नाईक हवालदार । गज उंट घोडेस्वार । भाला बरची तलवार । तोफा बंदुका जेजाला ॥ २९९ ॥ हें सर्व सामान निरुतें । सेनापतीशब्दें ग्रहण होतें । तेंच आहे पहा नातें । ज्ञान

ज्ञानाच्या अंगांचें ॥ ३०० ॥ यासाठीं म्हणून । अवघ्या साधनासहित ज्ञान । करा बाप हो सेवन । इच्छित हेतु साधावया ॥ ३०१ ॥ पुढच्या तीन सूत्रीं तत्त्वता । जी ईशभक्ती केली असतां । फलमोक्षाचें येत हातां । तें ईशस्वरूप कथियेलें ॥३०२॥

नामैश्वर्यपरां काश्यपः परत्वात् ॥ २९ ॥

काश्यपाचें ऐसें म्हणणें । अनन्यभावें जीवानें । भजावें ईश्वराकारणें । निजकल्याण व्हावया ॥ ३०३ ॥ ईश्वराहून परता । श्रेष्ठ ना कोणी तत्त्वता । म्हणूनि जीवाची योग्यता । असे त्यास भजण्याची ॥ ३०४ ॥ जीव आणि ईश्वर । आहेत भिन्न साचार । सर्व प्रकारें अधिकार । आहे एक्या ईश्वराचा ॥ ३०५ ॥ तो सृष्टीचा नियंता । तोच सृष्टीचा संरक्षिता । तोच आहे संहारिता । या अवाढव्य जगातें ॥ ३०६ ॥ श्रोते हो प्रत्येक शरीरांत । जो जीवात्मा वास करीत । तो निरनिराळा आहे सत्य । तो सगळ्यांचा एक नसे ॥ ३०७ ॥ फरक इतुकाच आहे त्यांत । शरीर अवघें नाशिवंत । येथें एक शाश्वत । आहे मात्र जवात्मा ॥ ३०८ ॥ परी जीवात्मे निरनिराळे । कृतकर्माचीं भोगितीं फळें । त्या जीवांची कधीं न टळे । या न्यायें पुनरावृत्ती ॥ ३०९ ॥ म्हणजे पापपुण्य जीव करिती । ते जन्म घेऊन भोगिती । या तत्त्वाची प्रचीती । पाहण्या मिळे प्रत्यक्ष ॥ ३१० ॥ एक म्हणतां जीवासी । तें न पटे विचारासी । एक भोगितो सुखासी । आणि दुःखानुभव एकाला ॥ ३११ ॥ या न्यायें म्हणून । जीवात्मे ते भिन्न भिन्न । एक म्हणण्याचें प्रयोजन । मुळींच नाहीं राहिलें ॥ ३१२ ॥ आतां जीव आणि ईश्वर । एक न होती साचार । ज्ञेय आहे परमेश्वर । जीव त्याचा ज्ञाता असे ॥ ३१३ ॥ जें कांहीं ज्ञेय असतें । तें ज्ञात्यापासून भिन्न असतें । म्हणून तें जाणतां येतें । ज्ञेय ज्ञात्याकारणें ॥ ३१४ ॥ आतां पहा जीवाकारण । तुम्ही अहो श्रोतेजन । ते आहेत भिन्न भिन्न । एकाची प्रचीती एका नसे ॥ ३१५ ॥ एक जीव राजापोटीं । एक जीव झाला वरठी । एक हातीं घेऊन काठी । झाला शिपाई राजाचा ॥ ३१६ ॥ एक भिक्षा वाढितो ।

एक भीक मागण्या येतो । एक पलंगीं लोळतो । एक निजला रकस्यावर ॥ ३१७ ॥ याचें शोधितां कारण । ते पूर्वजन्मीचें पाप पुण्य । आले भोगण्यालागून । कांहीं न यापलीकडे ॥ ३१८ ॥ ज्यानें बहुत केलें पुण्य । तो नृपपोटीं जन्मला जाण । ज्यानें पाप केलें दारुण । तो निजला रकस्यावरी ॥ ३१९ ॥ समत्व इतुकेंच ये ठायीं । तीं सर्व माणसें असती पाहीं । परी दर्जा समान नाहीं । येथें अधिक न्यून असे ॥ ३२० ॥ देह पूर्वीचा मावळला । परी जीवात्मा शेष उरला । पुनः जन्म घेऊन आला । तेथलें भोगण्या पाप पुण्य ॥ ३२१ ॥ देह अवघे नाशिवंत । ते त्या त्या जन्मींच पावती अंत । त्या जन्मींचें उर्वरीत । राहें मात्र पापपुण्य ॥ ३२२ ॥ तें जीवानें आहे केलें । म्हणून तें त्या पाहिजे भोगिलें । म्हणून ईश जीवात्मा वेगळे । मानणें आहे भाग पहा ॥ ३२३ ॥ पापपुण्याकारण । भोगण्या देह साधन । यापेक्षां मोठेपण । नाहीं मुळींच देहाचें ॥ ३२४ ॥ पहा एकानें इच्छित स्थलीं । जाण्या कारणें गाडी केली । ती मध्यें जरी मोडली । तरी तो दुसरी करून जाय तेथ ॥ ३२५ ॥ देह आहे अचेतन । जीव हा चेतन । त्या दोघांचें एकीकरण । मुळींच होणें नाहीं कीं ॥ ३२६ ॥ जीव जरी जड असता । तरी तो देहासवें नष्ट होता । आणि कृतकर्में भोगण्याकरितां । आला नसता पुनरपि ॥३२७॥ देह आणि जीवाचा । जरी कार्यकारण संबंध साचा । मानावा तरी चुकीचा । होईल तो ॥ ३२८ ॥ कां कीं कार्य मिळतां कारणीं । जातें समरस होउनी । मीठ जाय मिसळोनी । संबंध होतां सागराचा ॥ ३२९ ॥ तैसें न येथें जाहलें । म्हणून जीव नित्य ठरले । मात्र ते अवघे राहिले । निराळे त्या ईशापून ॥ ३३० ॥ श्रुती हेंच सांगे खरी । प्रपंचरूप वृक्षावरी । जीव-शिव बसले निर्धारीं । द्वा सुपर्णा मंत्र पहा ॥ ३३१ ॥ जीव कृतकर्में भोगीत । ईश त्या भोगण्या लावीत । जीव हा खचित । सेवक । त्या ईश्वराचा ॥ ३३२ ॥ म्हणू किंचिज्ज्ञशा जीवानें । शिवाची ना कधीं करणें । बरोबरी ती सेवकपणें । सेवा त्याची करावी ॥३३३॥ तुटका येऊन भूपाला । जरी श्रोते ऐसा वदला ।

तुझ्या माझ्यांत नाहीं उरला । भेद आपण एकचि ॥ ३३४ ॥ तुझें वैभव कामिनी । हें माझेच आहे जाणी । येथेंही त्याची वाणी । न्यायें होईल ग्राम्य पहा ॥ ३३५ ॥ म्हणून या जीवानें । ईश्वराची सेवा करणें । इच्छित सुखा मागून घेणें । कृपा त्याची संपादून ॥ ३३६ ॥ ऐसें काश्यपाचें आहे मत । तें कथिलें या सूत्रांत । आतां अवधान द्यावें त्वरित । पुढील सूत्र ऐकावया ॥ ३३७ ॥

आत्मैकपरां बादरायणः ॥ ३० ॥

आतां आचार्य बादरायण । या सूत्रीं करिती कथन । उपाधि-रहित ब्रह्मालागून । उपासिता मोक्ष लाधे ॥ ३३८ ॥ अत्यंत शुद्धशा जीवात्म्याची । म्हणजे उपाधिरहित वस्तूची । ज्ञान-लक्षणा नांवाची । पराभक्ती असावी ॥ ३३९ ॥ याचा करितां विचार । ऐसें कळतें साचार । वस्तूच झाली जगदाकार । जग नांवाच्या उपाधीनें ॥ ३४० ॥ ती जगद्भावाची । ज्ञानें उपाधी काढितां साची । भेट अखेर शुद्धाची । होते हा न्याय असे ॥३४१॥ पहा कडें आंगठी चंद्रहार । हे अवघेच आहेत भांगार । परी नामरूपांचे प्रकार । शुद्ध सोनें जाणत नसे ॥ ३४२ ॥ उपाधीचे प्रकार भले । सोन्यानेंच नांदविले । परी ना आपणा आणिलें । लघुत्व तें केव्हांही ॥ ३४३ ॥ कडीं आंगुठी चंद्रहार । नुसता भिन्न भिन्न आकार । शुद्ध सोन्यासी विकार । आकारानें झाला नसे ॥ ३४४ ॥ आकारासी पाहतां । मुळीं न त्यासी स्वतंत्रता । तत्त्व त्यांतून काढितां । अर्थताही शब्दा नव्हे ॥३४५॥ म्हणून शुद्ध आत्म्याची । पराभक्ती करितां साची । तीच घालील मोक्षाची । गांठ साधकांकारणें ॥ ३४६ ॥ वा नदी वृक्ष पर्वत । हे आकारविकारें भिन्न सत्य । परी शोधितां मूळा प्रत । तेथें विश्व जें तें एकचि ॥ ३४७ ॥ म्हणजे जें सावयवी । त्यास नाश आहे पाही । तत्त्व त्रिकालाबाधित राही । त्या न बाधा कशाची ॥ ३४८ ॥ रूपाप्रती जें येतें । तें मूळचें अरूप असतें । पहा शोधून घटातें । तो झाला मृत्तिकेचा ॥ ३४९॥ घट जिच्या-पासून झाला । तो सदैव झांकून तिला । आपण येतसे उदयाला ।

प्रतिष्ठा ती मिळविण्यास ॥ ३५० ॥ सावयव जग नाशिवंत। ज्या अर्थी आहे सत्य। त्या अर्थी तया प्रत। अविनाश प्रतियोगी पाहिजे ॥ ३५१ ॥ आतां विनाश म्हणजे रूपांतर। होणें आहे साचार। रूपांतराचे प्रकार। आहेत कीं नानाविध ॥ ३५२ ॥ रूपें बदलोत किती तरी। मूळांत फरक नाहीं परी। दृष्टी फेंका पाण्यावरी। वाफ बर्फ तेंच झालें ॥ ३५३ ॥ तैसें या दृश्य जगताचें। अव्यक्त मूळ ब्रह्म साचें। तें नानाप्रकारें रूपाचें। योगें इये प्रत्यया ॥३५४॥ पहा किल्ला वाडा आणि गढी। विटांनीं बनलीं रोकडीं। येथें वीट नित्य तेवढी। किल्ला वाडा अनित्य ॥ ३५५ ॥ म्हणजे जें असे एक। तेंच होतसे अनेक। हें अनेकत्व ना बाधक। होतें न त्याच्या एकपणास ॥३५६॥ आतां परमाणु-वादी ऐसें म्हणती। या अन्य अन्य पदार्थांप्रती। परमाणूही अन्य अन्य असती। तें मुळीं न एकजातीचे ॥३५७॥ हेंच प्रथमारंभीं खरें वाटतें। परी न तें विचारा टिकतें। पहा या भूमीतें। तिचे प्रकार किती तरी ॥ ३५८ ॥ भूमीच आहे पर्वत। भूमीच आहे वृक्ष सत्य। जे परमाणू वृक्षांत। तेच पर्वताचिया ठायीं ॥३५९॥ उपाधीच्या भेदानें। परमाणु भासती पृथक्पणें। तोच पंचतत्त्वां-कारणें। न्याय लावा विबुध हो ॥ ३६० ॥ तैसे पर्वत वृक्ष भूमी-परी। अविनाश वस्तु नटली खरी। तेज-पवनाकाश वारी। इत्यादि पंच भेदानें ॥ ३६१ ॥ आतां नित्यत्व भिन्नत्व जीवाचें। आहे कोणत्या प्रकाराचें। तें पाहिलें पाहिजे साचें। थोडा विचार करून ॥ ३६२ ॥ जीवात्मा आहे नित्य। म्हणजे तो आहे सत्। चेतन म्हणून आहे चित्। तैसा आनंदरूप आहे तो ॥३६३॥ सुषुप्तावस्थेच्या ठायीं। आनंदाचा प्रत्यय येई। म्हणून सच्चिदा-नंद जीवही। उपाधि जातां होतसे ॥३६४॥ जैसें पाणी नदीचें। घटामाजीं भरतां साचें। ग्रहण करून भेदाचें। घटतोय म्हणून राही ॥ ३६५ ॥ तो घटाचा उपाधी जातां। नदीस मिळे तत्त्वतां-मग तेथें भेदवार्ता। मुळींच नाहीं ॥ ३६६॥ तैत्तिरीय उपनिषदा-माझारीं। द्वितीय खंडांतरीं। सहाव्या मंत्राभीतरीं। हेंच आहे कथन केलें ॥ ३६७ ॥ कीं ब्रह्म हें नाहीं भिन्न। तें एकचि आहे

परिपूर्ण। तें उपाधीच्या योगेंकरून। भिन्न भिन्न भासतसे ॥ ३६८ ॥ जें एक निराकार। तेंच झालें साकार। हें अवघें चराचर। ब्रह्मानेंच व्यापिलें ॥३६९॥ एवं जीवात्मा नित्य मुक्त। ब्रह्मचि आहे साक्षात। परी उपाधिभेदें भासत। बद्ध झाला म्हणून ॥ ३७० ॥ ती उपाधी निरसन। जेव्हां होय ज्ञानेंकरून। तेव्हां तें बद्धपण। जाय सहज विलयाला ॥३७१॥ व्यक्त स्वरूप ब्रह्माचें। जीवात्मा हेंच साचें। म्हणून ज्ञानयुक्त पराभक्तीचें। सेवन केलें पाहिजे ॥ ३७२ ॥ तेणेंच जीवाचें बंधन। होवोनिया निरसन। मुक्तस्थितीकारण। भोगील पहा पुढें तो ॥ ३७३ ॥ उपाधि ती झाल्या दूर। जीव शिव एक साचार। ऐसें मानण्या आधार। आहे जाबालश्रुतींत ॥ ३७४ ॥ 'त्वं वा अहमस्मि भगवो देवते। अहं वा त्वमसि देवते'। म्हणून बादरायण झाले सांगते। ब्रह्मैक्यभावें भक्ती करा ॥ ३७५ ॥

## उभयपरां शांडिल्यः शब्दोपपत्तिभ्याम् ॥ ३१ ॥

ब्रह्मवेत्ते शांडिल्यमुनी। ऐसें वदती आपुले वदनीं। जीवात्मा परमात्मा हे दोन्ही। योग्य भक्ती करण्यासी ॥३७६॥ मायारूप उपाधींनीं। जीव जीवपणास आला जाणीं। बाकी जीव शिवा-ठिकाणीं। भेद मूळचा नसे हो ॥ ३७७ ॥ जे उपाधीनें व्याप्त झाले। ते जीव नांव पावले। उपाधीरहित राहिले। ते शिव म्हणजे ब्रह्म होय ॥ ३७८ ॥ त्या उपाधीनिरसनासाठीं। या पराभक्तीच्या खटपटी। तेणें जीवशिवाची होतां भेटी। सर्व कांहीं संपलें ॥ ३७९ ॥ या शांडिल्यमतांत। आणि बादराय-णाच्या म्हणण्यांत। येणें परी फरक पडत। तो आतां अवधारा ॥ ३८० ॥ हें अखिल विश्व ब्रह्माठायीं। विवर्तरूप आहे पाहीं। जेंवी शिंपल्याठायीं। भास होतो रजताचा ॥३८१॥ तो झालेला भास। प्रत्यक्ष रुप्याच्या स्वरूपास। कदा न येई निःशेष। तो केवळ भ्रम असे ॥ ३८२ ॥ त्या भासरूप रजतापरी। हें विश्व दिसे ब्रह्मावरी। हा भ्रम होतो दुरी। ज्ञान करून घेतल्यास ॥ ३८३ ॥ मत ऐसें शांडिल्याचें। जें प्रधानकारण विश्वाचें। तें

मिथ्या न व्हावयाचें । तें खरोखर आहे सत ॥३८४॥ त्या प्रधान-रूप सतानीं । आहे हा लादिला जाणी । जीवपणा तो जुलुमांनी। यच्चयावत् जीवांवर ॥३८५॥ त्या जुलुमाच्या प्रतिकारा । शास्त्र हेंच भक्ती परा । तें ज्ञानें करून अंगिकारा । म्हणजे उपाधी निरसेल ॥ ३८६ ॥ प्रधान कैसें आहे सत् । हें बेचाळिसाव्या सूत्रांत । शांडिल्यानें केलें ग्राथित । तें पुढें कळेल कीं ॥३८७॥ या प्रधानाच्या जुलमानें । जें सुखदुःख जीवाकारणें । पडलें आहे भोगणें । त्याचा विचार येथें करूं ॥ ३८८ ॥ हीं सुखदुःखें भोगण्याची । योग्यता नव्हे जीवाची । आनंदरूप तयाची । मूळचीच आहे भूमिका ॥ ३८९ ॥ त्या आनंदापासूनी । आपुल्या मोहरूप पाशांनीं । ओढिलें या प्रधानांनीं । यच्चयावत् जीवाला ॥३९०॥ येथें प्रकृति आहे प्रधान । त्या प्रकृतीचें निरसन । होणार आहे योगेंकरून । एक पराभक्तीच्या ॥ ३९१ ॥ आतां कश्यपाचें मत । जीवशिव हे भिन्न सत्य । विचारें पाहतां त्यांप्रत । तें ठरतें चुकीचें ॥ ३९२ ॥ मुद्दा ऐसा कश्यपाचा । जीवशिव भिन्न म्हणण्याचा । एकाच्या सुखदुःखाचा । अनुभव नसे दुसऱ्यातें ॥ ३९३ ॥ या एका मुद्यावरून । जीव म्हणे भिन्न भिन्न । परी हें अनुमान । ठरे चुकीचें यायोगें ॥ ३९४ ॥ श्रीगोदेचें पाणी भलें । अनंत घटांत सांठविलें । नाना उपाधींनीं केलें । युक्त पहा क्षणभर ॥ ३९५ ॥ एका भांड्याच्या खालतीं । जाळ लाविला निश्चितीं । तेणें आली तप्तता ती । त्या भांड्यांतील जलास॥३९६॥ एकांत टाकिली साखर । तें झालें गोड नीर । एकांत टाकिलें डांबर । तेणें घाणेरें झालें तें ॥ ३९७ ॥ येथें गोदावरीचें एकच नीर । परी उपाधीचे भिन्न प्रकार । उपाधीप्रमाणें साचार । तें होऊन बैसलें ॥३९८॥ एक पाणी तापलें । एक पाणी गोड झालें। एक घाण होऊन बैसलें । डांबराच्या संगतीनें ॥३९९॥ ब्रह्म येथें गोदावरी । घटतोय जीवापरी । उपाधिभेदें भिन्नता खरी । नये तेथें मानितां ॥ ४०० ॥ त्या उपाधीचा नाश होतां । मग कोठून भिन्नता । आहे तेंवी तत्त्वता । स्थिती या जीवाची ॥४०१॥ जीव-शिवाच्या विषयीचें । मत जें का कश्यपाचें । तें कैसें आहे

चुकीचें । हें बादरायणसूत्रीं कथन केलें ॥ ४०२ ॥ आतां शांडिल्याच्या मताप्रत । श्रुतीही आहे संमत । जीव जे उपाधि-विरहित । ते प्रत्यक्ष अंश शिवाचे ॥४०३॥ छांदोग्य उपनिषदांत । कथिलें शांडिल्यविद्येंत । बुध हो तृतीय खंडांत । पहा चवदाव्या मंत्रामधीं ॥ ४०४ ॥ सर्वं खल्विदं ब्रह्म । हेंच ब्रह्म अत्युत्तम । देणार आहे आराम । त्या ब्रह्मातें उपासितां ॥ ४०५ ॥ कां कीं ब्रह्मापासून । जगत् झालें निर्माण । भिन्नपणा तो म्हणून । नाहीं त्या दोघांमधीं ॥ ४०६ ॥ जें ज्यापासून निर्माण होतें । तें सजातीयचि असतें । पहा वैश्वानर अग्नीतें । तो न थंडी निर्माण करी ॥४०७॥ जग हे नांदे ब्रह्माठायीं । त्यास दुसरी जागाच नाहीं। ब्रह्मींच त्याचा लय होई । ऐसा आहे सिद्धांत ॥ ४०८ ॥ म्हणून उपासक जीवानें । उपाधिनाशाकारणें । आहे आत्म्यास ओळखणें । पराभक्तीच्या सहाय्यानें ॥ ४०९ ॥ ही उपासना करावया । कोठें नको लांब जाया । आहे प्रत्येकाच्या हृदया । आत्मतत्त्व बसलेलें ॥ ४१० ॥ देहपातानंतरीं । त्या शुद्धात्म्या-भीतरीं । मीही जाणार निर्धारीं । ही पराभक्ती केल्यानें ॥४११॥ ऐसें जो कां जाणत । तयाला न संशय उरत । हेंच शांडिल्याचें मत । म्हणून सेवा परा भक्ती ॥ ४१२ ॥ आतां इंद्रियें देहाचीं । चैतन्यप्रवण नाहींत साचीं । त्यांची ओढ अक्षयींची । आहे बाह्य विषयांकडे ॥ ४१३ ॥ त्या इंद्रियज्ञानें करून । करा न ब्रह्माचें अनुमान । अथवा कांहींतरी करून । त्या विषयींचा तर्क पहा ॥ ४१४ ॥ पहा आडवा हात समोरीं । निज नेत्राच्या धरिल्या-वरी । तो झांके सर्वतोपरी । रविमंडलाकारणें ॥ ४१५ ॥ सूर्य झांकिला म्हणून । तळहाताएवढा नारायण । ऐसें तर्क व अनुमान । केल्या होय चुकीचें ॥ ४१६ ॥ म्हणून ब्रह्माविषयीं अनुमानें । ऐसीं कोणी न काढणें । ब्रह्म पाहण्या धांव घेणें । आहे भाग वेदाकडे ॥ ४१७ ॥ वेदावीण ब्रह्मविचार । कोणी न केला साचार । जीवशिवाचा ऐक्यविचार । श्रुतीनेंच कथन केला ॥४१८॥ मुंडको-पनिषदामाझारीं । द्वितीय खंडाभीतरीं । केला आहे निर्धारीं । उहापोह तो याचा ॥ ४१९ ॥ त्या खंडाचा प्रथम मंत्र । हेंच आहे सांगत । अग्नीच्या ठिणग्यावत । स्थिती या

जीवांची ॥ ४२० ॥ तेंवी अक्षर ब्रह्मापून भले । हे क्षर जीव निर्माण झाले । हेंच गीतेनें सांगितलें । ममैवांशो या श्लोकीं ॥४२१॥ आतां गोदावरीचें वारी । कोणी पूजो घटांतरीं । कोणी बसून कांठावरी । पूजन करो तियेचें ॥४२२॥ त्या दोघां लागून । गोदेचेंच पूजन । घडणार आहे जाण । संदेह येथें मुळीं नसे ॥ ४२३ ॥ याच न्यायें करून । जीवशिवाचें अभिन्नपण । विचारानें ओळखून । पराभक्ती करावी ॥ ४२४ ॥

## वैषम्यादसिद्धमिति चेन्नाभिज्ञानवदवैशिष्ट्यात् ॥ ३२ ॥

आतां जीवाशिवाचें ऐक्यत्व । वैषम्यामुळें न संभवत । विचारें पाहतां जीवाप्रत । तो सुखदुःखाधीन असे ॥ ४२५ ॥ धर्म ब्रह्माचा तसा नाहीं । तो नित्य मुक्त आनंदमयी । उजेड अंधार एके ठायीं । राहणें कधींच घडेना ॥ ४२६ ॥ या न्यायें म्हणून । जीव मानणें आहे भिन्न । या तर्काचें निरसन । येणें रितीं होत असे ॥ ४२७ ॥ उजेड आणि अंधार । हे पृथक्पणें साचार । एकवटून राहणार । नाहीं हें खरें जरी ॥४२८॥ उजेडातें पाहण्यासी । अंधार तो गेल्यासी । तोच बसेल सर्वांशीं । होवोनियां उजेड पहा ॥४२९॥ सुखदुःखाधीन झाला । जीव तो उपाधीनें भला । तें सुखदुःख उपाधीला । आहे मुळीं न जीवासी ॥ ४३० ॥ पहा शुद्ध उदकाप्रत । भरलें रंगीबेरंगीं बाटलींत । दिसूं लागलें लाल पीत । म्हणून कां तो रंग त्याचा असे ॥४३१॥ शिशीच्या रंगाप्रमाणें । दिसे तें दृष्टीकारणें । तेंच पाहिल्या विचारानें । शुद्ध म्हणोन कळेल कीं ॥४३२॥ हिरवा लाल निळा पिवळा । हा शिशीचा धर्म भला । परी त्यांतील उदकाला । लेप त्याचा झाला नसे ॥४३३॥ सुखदुःखें जन्ममरण । हे देहबुद्धीचे धर्म जाण । हे शारीरक-मामांसीं केलें कथन । जगद्गुरू आचार्यांनीं ॥ ४३४ ॥ तुकडा एक सुवर्णाचा । पेटीमाजीं ठेविला साचा । या पेटीरूप उपाधीचा । लेप ना होई तयातें ॥ ४३५ ॥ लगडीच्याच सोन्यापरी । तोही आहे निर्धारीं । जीवशिवाचें याच परी । आहे नातें विबुध हो ॥४३६॥

## नचाक्लिष्टः परः स्यादनंतरं विशेषात् ॥ ३३ ॥

ऐक्य जीवेश्वराचें । पहा बुधहो मानल्या साचें । जीवाच्याच पंक्तीचें । ईश्वर बाहुलें असें एक ॥ ४३७ ॥ सुखी दुःखी जीव जसा । भोगी ईशही आहे तसा । तर्क एक उठे ऐसा । एक मानिल्या जीवशिवा ॥ ४३८ ॥ परी हे सुखदुःखादि प्रकार । जीवाचे ना साचार । सुखदुःखाचा अवघा भर । उपाधिवरी न जीवातें ॥ ४३९ ॥ ईश उपाधिरहित आहे । म्हणून त्यास कदा नोहें । सुखदुःखाचा संबंध पाहे । तो अत्यंत शुद्धचि ॥ ४४० ॥

## ऐश्वर्यं तथेति चेन्न स्वाभाव्यात् ॥ ३४ ॥

या सृष्टीच्या व्यवहारांत । ऐसा नियम निश्चित । जो भोगी दुःखांप्रत । तोच भोगी सुखातें ॥ ४४१ ॥ कां कीं सुख आणि दुःख । हे एकमेकां सापेक्ष देख । एक ना टिके निःशंक । दुज्याचिया वांचुनी ॥ ४४२ ॥ म्हणजे जो भोगी सुखास । तोच भोगी दुःखास । जो अनुभवी दुःखास । तोच भोगी सुखातें ॥४४३॥ या न्यायेंकरून । सच्चिदानंदा लागून । नाहीं क्लेशादि-दर्शन । मग सुख तेंही नसावें ॥ ४४४ ॥ ऐसें असून सत्य । त्या सच्चिदानंदतत्त्वाप्रत । आहे म्हणतां क्लेशरहित । हें कोण्या रिती समजावें ॥ ४४५ ॥ ऐशी शंका ये ठायीं । श्रोते मुळींच टिकणें नाहीं । ईश सुखरूप ठायींच्या ठायीं । क्लेशदुःख त्या ठावें नसे ॥४४६॥ हा सापेक्षपणाचा । धर्म कृतिजन्य वस्तूचा । निसर्गाचे ठायीं याचा । लाग न लागे यत्किंचित ॥ ४४७ ॥ पहा हा त्रिचरण । आहे उष्णतासंपन्न । म्हणून कां त्या भोगणें जाण । या न्यायें शीतता ॥ ४४८ ॥ ज्या अर्थी उष्णतासंपन्न । आहे हा त्रिचरण । त्या अर्थी शीतपण । भोगणें आहे तयासी ॥ ४४९ ॥ श्रोते याच वादापरी । तोही वाद निर्धारीं । क्लेश दुःखाची झुळुक खरी । त्या ईशा मुळीं नसे ॥४५०॥ तो सुखरूप सर्वदा । दुःख तेथें नाहीं कदा । सापेक्षधर्मं सूर्यपदा । तम हा कदाच जाणें नसे ॥ ४५१ ॥ वा एखादा भिकारी । दैन्य भोगितो सर्वतोपरी । म्हणून कां तो गादीवरी । जाऊन बसेल भूपाच्या

॥ ४५२ ॥ पहा मलिन आरशाप्रती । सूर्यकिरणें मलीन दिसती । म्हणून कां शुद्धाप्रती । त्याची बाधा होईल ॥ ४५३ ॥ तेजयुक्त मूळचे किरण । त्यांसी नाहीं मलिनपण । दर्पणमालिन्येंकरून । तें मलिन दिसेल कीं ॥४५४॥ ईश्वराचें ईशत्व । कृतिजन्य नाहीं सत्य । म्हणून सापेक्षधर्मांप्रत । त्याचे ठायीं स्थान नसे ॥४५५॥ आतां जीव हा ईशाचा । ज्या अर्थी अंश साचा । त्या अर्थी तयाचा । धर्म पाहिजे ईशापरी ॥ ४५६ ॥ ऐसें खरें असून । या जीवाचें ईशपण । कां हो प्रत्ययालागून । अंशेंही येत नसे ॥४५७॥ उपाधीनें जीव झाला । परी तो ईशांश आहे भला । परी मूळच्या स्वभावाला । त्यानें विसरतां कामा नये ॥ ४५८ ॥ पहा समुद्राचें पाणी । घटांत ठेविलें भरोनी । म्हणून खारटपणा लागूनी । तें न टाकी ते ठाया ॥ ४५९ ॥ त्याच न्यायें जीवाचें । नित्यमुक्तत्व मूळचें । कां लोपावें सांगा साचें । जीवदशे-माझारीं ॥ ४६० ॥ या शंकेचें निराकरण । करण्या पुढील सूत्र जाण । सांगते झाले ज्ञानघन । शांडिल्य ऋषी विबुध हो॥४६१॥

अप्रतिषिद्धं परैश्वर्यं तद्भावाच्च नैवमितरेषाम् ॥ ३५ ॥

ईश्वराचें ऐश्वर्य । श्रुतियुक्तिनें न बाधित होय । म्हणोन ते नैसर्गिक पाय । येथें शंका घेणें नको ॥ ४६२ ॥ श्रुति सिद्धांत सांगते । युक्ति खरा खोटा पडताळिते । म्हणून प्राधान्य दोहीं-तें । देणें आहे विबुधहो ॥४६३॥ जो कोणत्याही उपायीं । नाहींसा करितां येत नाहीं । ऐसा जो तोच होई । निसर्गदत्त धर्म पहा ॥४६४॥ अग्नीचें आग्निपण । नये करितां वेगळें जाण । किती जरी कसून । प्रयत्न केले नानाविध ॥ ४६५ ॥ अग्निपण जे उष्णता । तीं संलग्न त्यासी सर्वथा । गोडी-साखर वेगळी करितां । येईल काय कवणातें ॥४६६॥ तैसें ऐश्वर्य आणि सामर्थ्य देख । ईशाचे धर्म नैसर्गिक । अक्षय अभंग निर्विकल्प । सुखसंपन्न ईश असे ॥४६७॥ऐशा त्याच्या ऐश्वर्याची । तुटी त्यापून ना व्हावयाची । तर्कवितर्क प्रमाणाची । गति तेथें कुंठित ॥४६८॥ जीव हा ईशांश आहे । तो क्लेशग्रस्त दिसतो पाहे । तो धर्म त्याचा नोहे ।

आहे तेथल्या उपाधीचा ॥ ४६९ ॥ पहा अग्निनारायण । मूळचा तेजसंपन्न । परी भस्मांत गेल्या झांकून । तेज त्याचें दिसेना ॥ ४७० ॥ ती वरील राखाडी । काढूं जातां रोकडी । प्रत्यया येतें तांतडी । मूळस्वरूप अग्नीचें ॥४७१॥ तेवीं जीवाचें लक्षण । तंतोतंत आहे जाण। जीवाचें तें ईशपण। उपाधीनें लुप्त होतें॥४७२॥ ती उपाधी जीवात्म्याची । पराभक्तीनें जाय साची । घोषणा ही श्रुतीची । आहे याच प्रकारें ॥४७३॥ पहा तुम्ही छांदोग्यातें । परंज्योतिरूप संपद्यते । स्वेन रूपेणाभिनिष्पद्यते। ऐसें स्पष्ट कथिलें कीं ॥४७४॥ क्लेशदुःखादि प्रकार । आले उपाधीबरोबर । जैसा राखाडीनें वैश्वानर । तेजहीन भासला ॥४७५॥ उपाधी उत्पन्न होते । ती नाहिंशी करितां येते। ती नाहिंशी होतां दिसतें । पूर्व स्वरूप स्पष्ट पहा ॥ ४७६ ॥ उपाधि-नाशा बरोबरी । क्लेशदुःख होईल दुरी । अभ्रें जातां गगनोदरीं । सूर्य स्पष्ट दिसे जैसा ॥ ४७७ ॥ त्या अभ्रा घालवी प्रभंजन । तेवीं पराभक्तीचें लक्षण । सुखदुःखाचें अभ्र पूर्ण । निवटेल योगें भक्तीच्या ॥ ४७८ ॥ श्रोते या सूत्रांत । ऐश्वर्य ईशाचें अबाधित । आहे ऐसें कथिलें सत्य । परी येते एक शंका ॥४७९॥ महाप्रलयाच्या वेळीं । सृष्टि जेव्हां न उरे मुळीं । तेव्हां ही ऐश्वर्याची नव्हाळी । उरली न ईश्वराला ॥ ४८० ॥ ना भूमी ना रयत । ना हर्म्य ना गादी सत्य । ऐशा व्यक्तीतें नृपनाथ । म्हणतां कां तें योग्य ठरे ॥ ४८१ ॥ जेव्हां महाप्रलय होईल । अवघेंच विलया जाईल । तेव्हां ईशऐश्वर्यही होईल । नाहींसेंच जगास ॥ ४८२ ॥ म्हणजे ईश्वराच्या वैभवाला । बाधितपणा येईल भला । प्रलयाच्या वेळेला । मग तो अबाधित म्हणतां कसें ॥ ४८३ ॥ या शंकेला उत्तर । छत्तिसाव्यांत साचार । आहेत बुध हो देणार । महाज्ञाते शांडिल्यमुनी ॥ ४८४ ॥

## सर्वानृते किमिति चेन्नैवं बुद्ध्यानंत्यात् ॥ ३६ ॥

आतां या विश्वाचा । आत्यंतिक लय साचा । कधींच नाहीं व्हावयाचा । तो शब्दगौरव एक ॥४८५॥ कां कीं अनादि आणि

अनंत । ईश्वराचें ऐश्वर्य सत्य । ते कोणत्याही स्थितींत । मुळींच बाधित होणें नसे ॥ ४८६ ॥ पहा पट जेव्हां विस्तारतो । तेव्हां थोर भासतो । तोच गुंडाळितां होतो । अकुंचितशा स्वरूपाचा ॥४८७॥ अकुंचित जरी झाला । परी विस्तार लया नाहीं गेला । तो अकुंचित स्वरूपें राहिला । जशाचा तसा कायम ॥ ४८८ ॥ गुंडाळल्यानें इतकेंच झालें । विस्तारत्व संपलें । परी संकुचितपणें उरलें । विस्तारबीज तेच ठायां ॥४८९॥ पहा एक चादर । पसरण्या पुरली मैलभर । तीच घडी केल्यावर । लहान जागेंत राहिली ॥ ४९० ॥ घडी केली म्हणून । प्रसरणशक्ति लोपली न । हें अल्पसें उदाहरण । अर्थबोध व्हाया दिलें ॥४९१॥ हें अवघें दृश्य विश्व । आणि चेतनात्मक जे जीव । हाच मायेचा आहे ठाव । म्हणजे बुध हो स्वरूप तिचें ॥ ४९२ ॥ ईशाची जी शक्ती । तीच आहे प्रकृती । आणि माया ऐसें तिलाच म्हणती । शब्दव्यवहार चालावया ॥ ४९३ ॥ अग्नि आणि अग्निपण । हें मुळींच नाहीं भिन्न । हेंही नातें तत्समान । पुरुष आणि प्रकृतीचें ॥४९४॥ विश्वाकार विस्तारली । जरी ही सृष्टि बुध हो भली । परी ती मायाच राहिली । कांहीं न यापलीकडे ॥ ४९५ ॥ संकुचित झाली तरी माया । विस्तारली तरी माया । हें तत्त्व बाधित व्हाया । जागाच नाहीं राहिली ॥ ४९६ ॥ प्रकृति आणि पुरुष । हे अनादि निःशेष । हे द्वैतदशेस । येते ना कधींही ॥ ४९७ ॥ यांचें शाब्दिक आहे द्वैत । प्रकृतिपुरुष एक तत्त्व । जैसा आहे प्रभेसहित । तेजोराशी भास्कर ॥ ४९८ ॥ जगमान्य भगवद्गीतेंत तेराव्या अध्यायांत । एकोणिसाव्या श्लोकांत । साकल्यें हें कथन केलें ॥ ४९९ ॥ प्रकृतिं पुरुषं चैव । हें त्या श्लोकाचें आहे नांव । उगमावांचून घेईना धांव । प्रवाह तो संगमाकडे ॥५००॥ म्हणजे ज्याचा आहे आरंभ झाला । शेवट त्याचा होतो भला । मेघांतील पाण्याला । उगमसंगम दोन्ही नाहीं ॥ ५०१ ॥ ईश्वराच्या ऐश्वर्याला । आरंभ कधींच नाहीं झाला । म्हणूनीच शेवट त्याला । नाहीं हाच सिद्धांत ॥५०२॥ विश्वाचिया प्रलयकालीं । जीं जीवांचीं कर्में उरलीं । तींच पुढच्या वेळेस झालीं । विश्वो-

त्पत्तीस कारण ॥ ५०३ ॥ आतां अखिल विश्वालागून । आहे उपादान कारण । ब्रह्म हें स्वयमेव जाण । ब्रह्ममीमांसा म्हणतसे ॥ ५०४ ॥ या न्यायें विश्वाचा । उपादान हा ईश साचा । मग तो आहे म्हणावयाचा । विकारीच निःसंशय ॥ ५०५ ॥ ताक दही घृताचें । उपादान दूध साचें । दुधाप्रमाणें ब्रह्माचें । विकारत्व होतें शाबीत ॥ ५०६ ॥ या प्रश्नाचें उत्तर । पुढील सूत्रीं साचार । आहे बुध हो येणार । तें आतां अवधारा ॥ ५०७ ॥

प्रकृत्यंतरालादवैकार्यं चित्सत्तेनानुवर्तमानात् ॥ ३७ ॥

या विश्वातें सर्वतोपरी । कारण जी प्रकृती खरी । ती आहे विकारी । पुरुष हा तैसा नसे ॥ ५०८ ॥ गुणधर्म या विकाराचे । प्रकृतीठायीं दिसती साचे । म्हणून विकारी जगताचें । ती झाली कारण ॥ ५०९ ॥ ज्याचें कारण जैसें असे । तेंच कार्याठायीं दिसतसे । पहा सोन्याचा लोप नसे । ते अलंकार झाले जरी ॥ ५१० ॥ भगवद्गीता ग्रंथांत । सांगता झाला भगवंत । पहा सातव्या अध्यायांत । प्रकार दोन प्रकृतीचे ॥ ५११ ॥ अपरा प्रकृतीचे ठायीं । आठ प्रकार असती पाहीं । त्यांची नामाभिधाही । ऐका तुम्हां सांगतों ॥ ५१२ ॥ पृथ्वी जल तेज पवन । आकाश आणि अहंकार जाण । सात आठासी अभिधान । महत्तत्व आणि अव्यक्त ॥ ५१३ ॥ सर्व विश्वातें धारण । जी जीवात्म प्रकृती करी जाण । अशा त्या प्रकृतीलागून । परा हें नांव असे ॥ ५१४ ॥ या दोहींच्या योगानें । जड सृष्टी स्वरूपा येणें । त्या उभय प्रकृतीकारणें । अधिष्ठान पुरुष हा ॥ ५१५ ॥ सांगती श्रीमत् शंकराचार्य । जे अखिल जगाचे गुरुराय । जे प्रत्यक्ष ज्ञानसूर्य । भरतखंडीं उदेले ॥ ५१६ ॥ त्या श्रीमदाचार्यांनीं । आपुल्या स्वानुभवें करोनी । सिद्धांत ठेविला सांगोनी । तो असे येणें रिती ॥ ५१७ ॥ मी सर्वज्ञ जो ईश्वर । प्रकृतीच्या द्वारें साचार । जगत्कारण जगदाधार । होवोनिया राहिलों ॥ ५१८ ॥ अतएव मी परी । नोहें नोहें विकारी । विकाराचीं कार्यें सारीं । असती ठायीं प्रकृतीच्या ॥ ५१९ ॥ पहा युद्ध व्हावया कारण । भूपाळ ते होती जाण । परी

 

जखमा अथवा मरण । नशिबीं सैनिकांच्या ॥ ५२० ॥ येथें जखम मृत्यूचा विकार । सैनिकांसी साचार । कारण जो नृपवर । त्या न बाधा विकाराची ॥ ५२१ ॥ आतां विश्वाचें साक्षात । प्रकृती कारण असल्या सत्य । मग हें जग प्रकृतिस्थ । सहज म्हणावें लागेल कीं ॥ ५२२ ॥ कार्य हें कारणासीं । अनन्य आहे अहर्निशीं । म्हणून विरोध श्रुतीशीं । येऊं पाहे त्या योगें ॥५२३॥ तस्मिन् सर्वं प्रतिष्ठितं । म्हणजे ईश जो कां पुरुषोत्तम । त्याचेच ठायीं विराम । पावे आणि राहे जग ॥ ५२४ ॥ गीताही सांगे याचपरी । नवव्या अध्यायाभीतरीं । मयाततमिदं श्लोकावरी । दृष्टि फेका म्हणजे कळेल ॥ ५२५ ॥ या शंकेचे निरसनार्थ । अड-तिसावें आहे सूत्र । त्याकडे द्यावें त्वरित । अवधान आतां आपुलें ॥ ५२६ ॥

तत्प्रतिष्ठा गृहपीठवत् ॥ ३८ ॥

श्रुती आणि स्मृती । खोटें कदा न प्रतिपादिती । कल्पनेच्या मारितातीं । भराऱ्या मात्र कादंबऱ्या ॥ ५२७ ॥ श्रुतिस्मृतींचें सांगणें । आहे सूत्ररूपानें । त्याचा योग्य विचारानें । लावणें आहे निर्णय ॥ ५२८ ॥ जग हें आहे ईश्वरस्थ । म्हणजे तें प्रकृतीच्या सहित । ब्रह्माठायीं सदोदित । विराजमान जाहलें ॥ ५२९ ॥ म्हणजे जग प्रकृतीच्या ठायीं । आणि प्रकृती ती ब्रह्मांत पाहीं । म्हणून कोठेंच विरोध नाहीं । श्रुतिस्मृतींच्या सिद्धांताला ॥ ५३० ॥ पहा विचार करून अंतरीं । कोणी एक बसला घरीं । पाट मांडून त्याचे वरी । अथवा कोणी गालिच्यास ॥ ५३१ ॥ परी ते दोघे जण । घरांतचि बसले जाण । पाट गालिचा भेदें-करून । गृहीं बसला हें न खोटें ॥५३२॥ पाट आणि गालिच्याचा । जो गृहासी संबंध साचा । तोच प्रकृतीपुरुषाचा । संबंध आहे तंतोतंत ॥ ५३३ ॥ पाटगालिचा ही प्रकृती । सदन येथें पुरुष निश्चितीं । आधारावीण ना राहों शकती । पाटगालिचे कोठेंच ॥ ५३४ ॥ या न्यायें करून । जग हें ब्रह्मस्थ आहे पूर्ण । येथें असत्य

भाषण । मुळींच नाहीं ॥ ५३५ ॥ ऐसा हा परंपरेनें । ईश जगता कारणें । कारण कैसा हें स्पष्टपणें । कथिलें पुढील सूत्रांत ॥५३६॥

## मिथोपेक्षणादुभयं ॥ ३९ ॥

आतां जगा कारण जी प्रकृती । ती ईश्वराची होय शक्ती । जेंवी अग्निठायीं उष्णता ती । वास करी विबुध हो ॥ ५३७ ॥ उष्णता ही अग्नीची । शक्ती आहे पहा साची । आणि त्याच शक्तीनें व्हावयाचीं । कार्यें आहेत विबुध हो ॥ ५३८ ॥ चुलीवरी ठेवलेलें । अन्न उष्णताच शिजवी भलें । किंवा कोठें जरी पोळलें । तरी तें उष्णतेनें ॥५३९॥ ऐशी ती उष्णता खरी । शिजाविण्या-पोळण्याचें कार्य करी । परी अग्नीपासून दुरी । ती न होय यत्किंचित ॥ ५४० ॥ म्हणून तें शिजाविणें अन्न । उष्णताच आहे कारण । म्हणून अग्नीचें प्रयोजन । नाहीं अन्न शिजाविण्या॥५४१॥ ऐसें कोणी म्हणेल जरी । तरी ते बालिश बोल सर्वतोपरी । कां कीं अग्नीच्या आधारें करी । कार्य ती शिजाविण्याचें ॥५४२॥ कां कीं अग्नीवांचून । उष्णतेला नाहीं स्थान । आणि उष्णते-वांचून । अग्नि नये प्रत्यया ॥ ५४३ ॥ अग्नि आणि उष्णतेंत । शब्दानेंच होतें द्वैत । परी तें न टिके यत्किंचित । पूर्ण विचार केल्यावरी ॥ ५४४ ॥ म्हणजे जगता कारण प्रकृती । प्रकृतीला शिव निश्चिती । ऐसे अनुभवामृत ग्रंथीं । बोलिले महाराज ज्ञानेश्वर ॥ ५४५ ॥ ऐसा परंपरेनें । ईश्वर या जगताकारणें । मूळ पूर्ण विचारानें । पहा म्हणजे कळेल तो ॥ ५४६ ॥

## चेत्याचितोर्न तृतीयं ॥ ४० ॥

चेत्या आणि चित् । या दोघांविरहित । कांहीं न कोठें सत्य । म्हणजे प्रकृति पुरुष हेच खरे ॥ ५४७ ॥ तिसरा हा जो शब्द लिहिला । तो इतक्याच साठीं असे भला । अन्य शास्त्रांचा गल-बला । व्यर्थ हें दावण्यास ॥ ५४८ ॥ सांख्य शास्त्रांमाझारीं । तत्त्वें पंचवीस कथिलीं खरीं । त्यांची आहे येणें परी । नामविधा

तीं श्रवण करा ॥ ५४९ ॥ प्रकृती प्रधान थोर । दुसरा महद्-हंकार । शब्द स्पर्श रूप रस साचार । गंधादिक विबुध हो ॥ ५५० ॥ तेवीं महाभूतें पंच । ज्ञानकर्मेंद्रियें पंच पंच । जीवात्मा आणि मन साच । ऐसीं आहेत कथियेलीं ॥ ५५१ ॥ तत्त्वसंख्या निरनिराळी । अन्य अन्य शास्त्रीं कथन केली । परि तीं अवघीं सामावलीं । एक्या पहा प्रकृतींत ॥ ५५२ ॥ म्हणजे हीं अवघीं तत्त्वें । प्रकृतीचीं कार्यें निरुतें । त्या सर्वांचें ग्रहण होतें । एक्या प्रकृति शब्दानें ॥ ५५३ ॥ एवं च ज्ञेय आणि ज्ञाता । इतुकेंच खरें सर्वथा । याच दोहींची व्यापकता । चहूं-कडे दिसतसे ॥ ५५४ ॥ एकूणचाळिसाव्या सूत्रांत । जें उभयं मिथोपेक्षणात् सत्य । आणि तृतीय जो शब्द येथ । लिहिला आहे चाळिशीं ॥ ५५५ ॥ निराकरण त्या दोहींचें । करण्यासाठीं सूत्र पुढचें । शांडिल्यमुनी बोलिले वाचे । तें आतां परियेसा ॥ ५५६ ॥

## युक्तौ च संप्रदायात् ॥ ४१ ॥

अनादि कालापासून । पुरुष आणि प्रकृती जाण । झालीं आहेत कारण । या अखिल विश्वाचें ॥ ५५७ ॥ म्हणजे प्रकृति आणि पुरुषाचा । जो हा संबंध आहे साचा । तो निराळ्या प्रकारचा । तो न शब्दीं वर्णवे ॥ ५५८ ॥ संयोग व्हाया कारण । व्यक्ति असाव्या लागती दोन । येथें द्वैताची मुळींच वाण । प्रकृतिपुरुषाचिये ठायीं ॥ ५५९ ॥ शिवाय संयोगसंबंध जो कां होई । तो अनित्य वस्तूचा होतो पाहीं । येथें अनित्यपण मुळींच नाहीं । प्रकृति आणि पुरुषांत ॥ ५६० ॥ हीं पुरुष आणि प्रकृती । एकरूप निश्चितीं । जैसी पुरुष आणि त्याची शक्ती । वा अग्निठायींची उष्णता ॥ ५६१ ॥ शक्ती पुरुषापासून । वा उष्णता अग्नीवांचून । जेवीं नाहीं राहणें जाण । तैसेंच हें तंतोतंत ॥ ५६२ ॥ अनादि हे प्रकृति पुरुष । एकमेकांसी समरस । येतुलही प्रत्ययास । द्वैत नये त्यांचे ठायीं ॥ ५६३ ॥ माया म्हणजे

प्रकृती । ती खोटी निश्चिती । नाश आहे तिजप्रती । मग ती पदार्थ होय कसा ॥ ५६४ ॥ चाळिसाव्या सूत्रांत । प्रकृती हा पदार्थ । मानिला आहे सत्य । ते कोणच्या अनुरोधें ॥ ५६५ ॥ हेंच सांगण्याविषयीं । बेचाळिसावें सूत्र आहे पाहीं । तें आतां लवलाहीं । सांगतों तें श्रवण करा ॥ ५६६ ॥

शक्तित्वान्नानृतं वेद्यं ॥ ४२ ॥

आतां श्रोते प्रकृती । ही ब्रह्माची साक्षात् शक्ती । म्हणून अनृत तिजप्रती । कोणत्याही प्रकारें म्हणतां नये ॥ ५६७ ॥ सांख्यांचें ऐसें मत । कीं या सर्व विश्वाप्रत । प्रकृती जिला म्हणतात । तें प्रधान कारण असे ॥ ५६८ ॥ जग आहे त्रिगुणात्मक । म्हणून त्याचें कारण ही निःशंक । असलेंच पाहिजे चोख । त्रिगुणात्मक विबुध हो ॥ ५६९ ॥ ब्रह्माचिये ठिकाणीं । आहे गुणाचा अभाव जाणी । म्हणून तें जड जगालागुनी । नये म्हणतां मूळकारण ॥ ५७० ॥ प्रकृती ती जड आहे । म्हणून जगा कारण पाहें । ब्रम्हाचा धर्म तैसा नोहे । तें आहे चेतनरूप ॥ ५७१ ॥ सांख्य आपल्या पुष्टीकारण । श्वेताश्वतराचें वचन । पुढें देती ठेवून । श्रुतिप्रामाण्य दावावया ॥ ५७२ ॥ तो चवथ्या खंडांतील पांचवा । मंत्र ' अजामेकां ' बरवा । त्याचा मथितार्थ ऐकावा । थोडा तुम्हां सांगतों ॥ ५७३ ॥ अनादि अद्वितीय त्रिगुणात्मक । अनंत प्रजा निर्मी देख । ती स्वतंत्र आहे एक । ह्या विश्वोत्पत्तीला ॥ ५७४ ॥ हें सांख्याचें मत झालें । आतां वेदांत्याचें राहिलें । तिकडे पाहिजेल दिलें । तुम्ही अपुलें अवधान ॥ ५७५ ॥ अनादि अनंत सर्वव्यापी । ऐसीं दोन तत्त्वें कदापी । प्रधान आणि पुरुषरूपी । मुळीं नसती संभवनीय ॥ ५७६ ॥ एकचि तत्त्व जगाठायीं । सर्वव्यापी होऊन राही । येथें दुसऱ्याची वार्ताच नाहीं । तो अधिकार ब्रह्माचा ॥ ५७७ ॥ प्रकृति आणि ब्रह्म ऐसीं । दोन तत्त्वें मानिलयासी । परिच्छिन्नता दोषासी । देणें भाग तेथें मग ॥ ५७८ ॥ सांख्यांनीं या

श्रुतीचा । आपुल्या मता सम्मत साचा । केला अर्थ परी त्यांचा । तो चुकीचा असे कीं ॥ ५७९ ॥ नेह नानास्ति किंचन । हें आहे श्रुतीचें वचन । ब्रह्म एकचि कारण । या अवघ्या विश्वास॥५८०॥ जड आहे प्रकृती । ती न निर्मी विश्वाप्रती । नाहीं नाहीं मुळींच ती । प्रकृतीला स्वतंत्रता ॥ ५८१ ॥ ब्रह्माठायीं विश्वाचा । मायेनें भास होतो साचा । भास हा न व्हावयाचा । खरा कोण्याही स्थितींत ॥ ५८२ ॥ शिंपीठायीं रजत । आणि दोरीठायीं सर्प सत्य । जरी भासला तरी असत् । आहेच तो केव्हांही ॥५८३॥ जग हें झालेंच नाहीं । तें अवघें ब्रह्मचि पाहीं । येणें जाणें मुळीं नाहीं । अविनाश ब्रह्माकारणें ॥ ५८४ ॥ हें मत वेदांत्याचें । आतां ऐका शांडिल्याचें । ते म्हणती जगताचें । कारण प्रकृति आणि पुरुष ॥ ५८५ ॥ जड जे कां प्रकृती । ती सृष्टिरूपें परिणत होती । परी परिणत होण्याची शक्ती । नाहीं नुसत्या जडांत ॥ ५८६ ॥ तेवीं चैतन्याकारण । आकार ना विकार जाण । मग ऐशापासून । विकारी जग व्हावें कसें ॥ ५८७ ॥ बीज हें परिणत होतें । वृक्षरूपें आकारा येतें । परी हें अवघें होतें । बीजाठायींच्या चैतन्यें ॥ ५८८ ॥ बीज भाजून टाकितां । त्याची संपे परिणतता । जड चैतन्याची एकता । असल्या कार्य घडे कीं ॥ ५८९ ॥ तैसी प्रकृती आहे जड जरी । ती चैतन्याशीं समरस परी । म्हणून तिला विकारी । होतां येतें बीजासम ॥५९०॥ म्हणजे शर्करा द्रव्य । चैतन्य गोडी अभिनव । ती पृथक् करण्या वाव । नाहीं कोणत्या प्रकारें ॥ ५९१ ॥ वन्हि आणि दाहकता । प्रभा आणि सविता । कस्तुरी आणि सुवासता । हें द्वंद्व नांवानें ॥ ५९२ ॥ तीच प्रकृतिपुरुषाची । स्थिती तंतोतंत साची । येथें ना व्हावयाची । पृथक्पणें निवड कदा ॥ ५९३ ॥ सांख्याचा हाच विचार । हें अवघें चराचर । आहे प्रकृतीचा बाजार । यासी न संबंध ईशाचा ॥ ५९४ ॥ कां कीं हा ईश्वर । होत नाहीं गोचर । कितीही केला विचार । श्रुतिशास्त्रें धुंडाळुनी ॥ ५९५ ॥ प्रकृतीचें तसें नाहीं । ते प्रमाणें सिद्ध होई । आणि खरें असल्याचा देई । अनुभव तो अवघ्यास ॥ ५९६ ॥ म्हणून जावत्कालपर्यंत ।

देही जीवात्मा आहे स्थित। मन उपाधीनें व्यापित। तोंवरी प्रकृती हीच खरी ॥ ५९७ ॥ हें सकृद्दर्शनीं खरें दिसे। परी विचारें संशय येतसे। त्या संशयाचा होतसे। वेदांतमतें नाश पहा ॥५९८॥ दृश्य ज्याच्या बळावर। प्रत्यया येतें साचार। तो राहणें अगोचर। हेंच योग्य आहे कीं ॥ ५९९ ॥ देह प्रतीतीस येतो। परी तो ज्याच्या बळें राहतो। तो न कधीं दृष्टीस पडतो। हा अनुभव नित्याचा ॥ ६०० ॥ तो असल्याचें अनुमान। देहाच्या चलनवलनादिकें करून। उपाधींवांचून प्राण। येत नाहीं प्रत्यया ॥ ६०१ ॥ म्हणजे प्रत्यय तो यावया। दोन्ही पाहिजेत तया ठाया। अद्वैत संबंध राहूनियां। विबुध हो ॥ ६०२ ॥ तो अद्वैत संबंध। प्रकृतिपुरुषींच आहे सिद्ध। त्यांच्या एकपणाला बाध। कोणाही आणितां नये ॥ ६०३ ॥ म्हणजे पुरुष हा सच्चिदानंद। प्रकृति शक्ती अभेद। येथें नको करणें वाद। मुळींच खऱ्याखोट्याचा ॥ ६०४ ॥ आहे आणि नाहीं। हें दोन्ही तत्त्वीं प्रत्यया येई। समन्वयानें पाहीं। करा दोहोंचा विचार ॥६०५॥ हें शांडिल्याचें मत। दोन्ही तत्त्वें आहेत सत्। मिथ्य सत्याचा पथ वाद लंगडा पडत असे ॥ ६०६ ॥

## तत्परिशुद्धिश्च गम्या लोकवल्लिंगेभ्यः ॥ ४३ ॥

आतां ईश्वराविषयींची। भक्ती शुद्ध स्वरूपाची। झाली कीं नाहीं साची। हें पहावें अवश्य ॥ ६०७ ॥ जेंवीं प्रेम व्यावहारिक। आहे कीं नाहीं चोख। हें बाह्य लक्षणें करूनि देख। कळून येतें पाहणारास ॥६०८॥ तेंवीं सद्भक्ताचीं लक्षणें। आहेत कीं कळून येणें। बाह्याकृतीच्या अनुमानें। तीं लक्षणें ऐका आतां ॥ ६०९ ॥ पूर्वीं कुरुक्षेत्रांत। भक्तलक्षणें भगवंत। सांगता झाला अर्जुनाप्रत। उपदेशितां गीतेतें ॥ ६१० ॥ तींच मी येथें देतों। पदरचें ना सांगतों। जो सर्वां भूतीं प्रेम धारितो। द्वेष न करी कवणाचा ॥ ६११ ॥ भूतमात्रीं कृपा करी। विषयाचें ना प्रेम धरी। अहंकारा ठेवी दुरी। न सोडितां लीनतेस ॥ ६१२ ॥ सुखदुःखा कारण। मानी न ज्याचें मुळीं मन। चित्तवृत्ती समाधान। राहे

ज्याची सर्वदा ॥६१३॥ इंद्रियें ज्याचीं स्वाधीन । निश्चय पर्वता-समान । क्रियेसहीत लक्ष पूर्ण । ठेवी भगवत्पदावरी ॥ ६१४ ॥ त्रासभूत ना होई कोणा । प्रेम उचंबळे क्षणक्षणां । ईश्वराविषयीं मनीं जाणा । वैराग्य ज्याचें जागृत ॥६१५॥ भीड नसे कवणाची । जो मूर्ती सन्नीतीची । आवडी काम्यकर्माची । कधींच ज्या असेना ॥६१६॥ जो निर्भय सदोदित । आपली प्रौढी ना मिरवीत । वितंडवादीं ज्याचें चित्त । न गुंते येतुलेंही ॥ ६१७ ॥ शीत उष्ण आणि मानापमान । यातें गणी समान । परनिंदेठायीं मौन । धरी तो भक्त हरीचा ॥ ६१८ ॥ ऐसीं लक्षणें दिसल्याविना । भक्त हरीचा मुळीं न म्हणा । या सामान्य कथिल्या खुणा । जाणीव होण्या भक्ताची ॥ ६१९ ॥ ज्या खुणा वरी दिसती । त्या मुरल्या पाहिजेत चित्तीं । त्यावांचून भक्तस्थिती । ये ना कोणा सिद्धांत हा ॥ ६२० ॥ बाह्यवेषेंकरून । बहुरूप्यासी राजेपण । जरी लाधतें कांहीं क्षण । परि तें खोटेंच सर्वथा ॥ ६२१ ॥ या आधुनिक कालामाझारीं । भक्त बनले वेषधारी । म्हणून कोणी साक्षात्कारी । श्रोते न निघे त्यांतून ॥ ६२२ ॥ बहुरूप्याचें राजेपण । जैसें राज्यावांचून । तैसें दांभिकाचें भक्तपण । साक्षात्काररहित असे ॥ ६२३ ॥ या त्रेचाळिसाव्या सूत्रांत । शांडिल्यमुनी कथितात । निवडतां यावेत भक्त अभक्त । कसे ते ॥ ६२४ ॥ आतां भक्ती पूर्ण झाली जरी । तो ईश्वराविषयीं जें जें करी । तें निष्काम सर्वतोपरी । असून अनन्यत्वें राहतसे॥६२५॥ तें ईशाचें आराधन । सर्व भक्तांचें न समसमान । तें चव्वेचाळीसांत केलें कथन । तें आतां अवधारा ॥ ६२६ ॥

समानं बहुमानप्रीतिविरहेतरविचिकित्सामहिमख्यातितदर्थ-
प्राणस्थानतदीयतासर्वतद्भावाप्रातिकूल्यादीनि च
स्मरणेभ्यो बाहुल्यात् ॥ ४४ ॥

भक्त सन्मान ठेवी ईश्वराचा । बहुमानही करी तयाचा । विषय त्याच्या प्रीतीचा । ईश हाचि एक असे ॥ ६२७ ॥ विरह

तरी त्याचाच मानी । इतराविषयीं संशय जाणी । तन्निष्ठ महिमे ठिकाणीं । जगणें करण्या ईशसेवा ॥ ६२८ ॥ ईश्वराचें सर्व कांहीं । आणि तोच नटला अवघें पाहीं । विरोध न करी कधींही । ईशतत्त्वाविषयीं जो ॥ ६२९ ॥ ऐसा लक्षणें करून । जो असे युक्त जाण । त्याचे हातीं भक्तपण । आलें आहे निःसंशय ॥ ६३० ॥ आतां हीं लक्षणें सारीं । प्रत्येक भक्ताभीतरीं । प्रत्ययासी न येती खरीं । मार्ग दिसती अलग अलग ॥ ६३१ ॥ जेंवी एक्या गांवाप्रत । मार्गवाटा असती बहुत । परी त्या योगें ना फरक होत । ग्रामाचिये ठिकाणीं ॥ ६३२ ॥ तैसेंच या भक्ताठायीं । मार्गी भिन्नपणा राही । परी तत्त्वाचिया ठायीं । फरक न पडे येतुला ॥ ६३३ ॥ अन्य अन्य पुराणांत । याचीं उदाहरणें आहेत । त्यांपैकीं थोडीं बहुत । ग्रथित करतों ये ठाया ॥ ६३४ ॥ भीमानुज जो अर्जुन । परमेश्वराचा ठेवण्या मान । जागृत राहे आवर्जून । कोणत्याही स्थितींत ॥ ६३५ ॥ आतां करणें बहुमान । तो तो येणेंप्रमाणें जाण । उपास्या सारखेपण । असेल ज्या ज्या वस्तूंत ॥ ६३६ ॥ त्यांचा आदर करणें । त्यांही वंद्य मानणें । हें इक्ष्वाकुराजानें । आचरून दाविलें कीं ॥ ६३७ ॥ इक्ष्वाकु उपासक विष्णूचा । श्यामवर्ण उपास्याचा । म्हणून श्यामवर्ण वस्तूंचा । आदर करी भूपती ॥ ६३८ ॥ कमल मृग आणि घन । यातें भूपाळ मानी जाण । कां कीं या वस्तू तीन । वर्णे समान हरीच्या ॥ ६३९ ॥ प्रीतीचें द्यावया उदाहरण । विदुरावांचून नाहीं आन । हुलग्याचें करी भक्षण । विदुरगृहातें श्रीपती ॥ ६४० ॥ विरह हरीविषयींचा । लाभप्रद झाला साचा । इतिहास पहा गौळणींचा । भागवतीं दशमस्कंधांत ॥ ६४१ ॥ एक भज्यावांचून । इतरांविषयीं संशयित मन । याचें स्पष्ट उदाहरण । उपमन्यूचें असे कीं ॥६४२ ॥ उपमन्यू बोले इंद्रासी । मी शिवाज्ञेनें अति हर्षी । जन्मेन कीटकोदरासी । परी तुझें नको त्रैलोक्य ॥६४३॥ नरकांतील जीवांला । यम पुसूं लागला । तुम्ही अवघे येथें आलां । या दारुण यातना भोगण्यासी ॥ ६४४ ॥ तेच हरीचें गुणवर्णन । केलें असतें प्रेमें

करून । तरी तुमचें प्रयाण । झालें असतें वैकुंठा ॥ ६४५ ॥ अगाध श्रीहरीचा महिमा । पातकाची करी क्षमा । अजामिळा सम विरामा । पावते झाले वैकुंठीं ॥ ६४६ ॥ ईशसेवेकारण । चिरंजीव झाला हनुमान । रामकथा करण्या श्रवण । अहोरात्र इच्छीतसे ॥ ६४७ ॥ वसू म्हणे राज्यासहित । मित्र कांता कन्या सुत । हे हरीचेच निश्चित । मालकी माझी मुळीं नसे ॥ ६४८ ॥ मी त्या प्रभूचा नुसता । नौकर म्हणजे गुमास्ता । येथील कामें करण्याकरितां । मज आहे नेमिलेलें ॥ ६४९ ॥ सर्वव्यापी ईश्वर । हें कयाधूचा कुमर । मानिता झाला साचार । शत्रु नुरला त्यास कोठें ॥ ६५० ॥ साक्षात् हिरण्यकश्यपूसी । बोलले प्रल्हाद ज्ञानराशी । राजा मम वशिला चित्तासी । आहे तुझ्या बसलेला ॥ ६५१ ॥ तो तुझा जो प्राण । तोच माझा नारायण । म्हणून माझें रक्षण । होईल सर्व ठिकाणीं ॥ ६५२ ॥ तो भूत-मात्रांच्या ठिकाणीं । एकचि पाहीं चक्रपाणी । प्रल्हादाचा याहुनी । भाव नव्हता निराळा ॥ ६५३ ॥ अप्रातिकूल्याचें । उदाहरण भीष्माचार्यांचें । व्यवहारदृष्टी पाहतां साचें । कृष्ण परमात्मा विरुद्ध ॥ ६५४ ॥ परी कृष्ण येतां समोरी । वदली भीष्माची वैखरी । कृष्णा आतां वेळ न करीं । रणीं मजला पाडावें ॥ ६५५ ॥ तेणेंच मी धन्य धन्य । या त्रिभुवनामाजीं होईन । अंतकाळीं अवलोकन । तुझें मजला घडूं दे ॥६५६॥ आतां कांहीं निमित्तें करूनी । उपास्याचे ठिकाणीं । उपासकाचे मनीं । द्वेष उत्पन्न होतसे ॥ ६५७ ॥ पहा कोणी ईश्वराचा भक्त । तयाच्या प्राप्तीप्रीत्यर्थ । तपा बैसला कंदरींत । उपास्याच्या प्रतिकापुढें ॥ ६५८ ॥ परी ईश्वर प्रसन्न होईना । तेणें राग आला मना । आणि उपास्याची विटंबना । करण्या झाला तयार॥६५९॥ या न्यायें भक्तासी । द्वेष उपजतो मानसीं । आपुल्या त्या उपास्या-विषयीं । मग हेंही लक्षण भक्तीचेंच ॥ ६६० ॥ निरसन या शंकेचें । पुढील सूत्रीं आहे साचें । अवधान द्या श्रवणाचें । तें सूत्र ऐकावया ॥ ६६१ ॥

## द्वेषादयस्तु नैवं ॥ ४५ ॥

लक्षणें हीं द्वेषादिक । भक्ताठायीं नसतीं देख । त्याचा भक्ति-पंथ अलौलिक । प्रेमभरित सोहळा ॥६६२॥ पराभक्तीचे ठायीं । द्वेषमोहाचें कारण नाहीं । त्याचें मन कसल्याही । वासनेला करीत नसे ॥ ६६३ ॥ निर्मूलन वासनेचें । जेव्हां सक्रिय होतें साचें । तेव्हांच पराभक्तीचें । द्वार सांपडे तयाला ॥६६४॥ श्रोते सकाम भक्तींत । एखादे वेळ ऐसें होत । परी द्वेषाचा किंचित् । लेश नसतो ते ठायीं ॥ ६६५ ॥ मर मेल्या म्हणे जननी । आपल्या बालकालागोनी । परी अंतर पाहतां शोधोनी । भाव मातेचा निराळा ॥ ६६६ ॥ तैसाच हा सकाम भक्त । उपास्याच्या समवेत । कांहीं वेळ असे वागत । परी प्रेमा सुटत नसे ॥ ६६७ ॥ तोच प्रेमा तयाचा । उत्तरोत्तर वाढतो साचा । क्षय होऊन वासनेचा । पराभक्तींत सहज येई ॥ ६६८ ॥ अनु-शासन पर्वाभीतरीं । बोलिली व्यासाची वैखरी । कुवासना त्या राहती दुरी । पुरुषोत्तमभक्तापासून ॥ ६६९ ॥ आतां कोणी म्हणतील येथ । शिशुपालादि वक्रदंत । बालघातिनी पूतना सत्य । द्वेषानेंच उद्धरली ॥ ६७० ॥ या कथेकारणें । पहा न वरवर दृष्टीनें । द्वेषमत्सरा नाहीं येणें । फळ मोक्षाचें कधींचि ॥ ६७१ ॥ द्वेषमत्सरें करून । अहोरात्र घडलें स्मरण । आणि कृष्णरूप झालें मन । म्हणून गेला मोक्षासी ॥ ६७२ ॥ निदि-ध्यासामाझारीं । आळीच होते भिंगोरी । तेथें आळी ना करी । भिंगोरी होण्याचा संकल्प ॥ ६७३ ॥ आतां जीं विधानें केलीं । तीं पुराणांतील सगळीं । पराभक्तीसी मुळीं । ये न त्यांचा संबंध ॥ ६७४ ॥ पराभक्ती ब्रह्माची । अपराभक्ती उपास्याची । मग हीं लक्षणें कोणाचीं । मानावीं हाच प्रश्न ॥ ६७५ ॥

## तद्वाक्यशेषात्प्रादुर्भावेष्वपि सा ॥ ४६ ॥

श्रोते मागील सूत्रांत । जीं लक्षणें केलीं ग्रथित । तीं पराभक्ती-प्रत । आहेत सर्व उपयोगी ॥ ६७६ ॥ म्हणजे तीं लक्षणें परेचीं ।

मानणें आहेत साचीं । येथें मुळीं न यावयाची । शंका परम भाविकां ॥ ६७७ ॥ जे जे झाले अवतार । ते ईश्वराचे साचार । त्या अवतारांचा प्रकार । ऐसा असे ॥ ६७८ ॥ जेंवी एखादा भूपती । वेषांतर करून राती । निघावा हो पाहण्याप्रती । बंदोबस्त राज्याचा ॥ ६७९ ॥ त्या घेतलेल्या वेषांत । कोणी ओळखून त्याप्रत । करूं लागला सन्मान बहुत । तरी तो होय राजाचा ॥ ६८० ॥ रगटें घेऊन अंगावरी । जरी राजा गस्त करी । तरी जाणीव राहे अंतरीं । मी राजा म्हणून ॥ ६८१ ॥ तैसेंच त्या ओळखणारा । नृपा भिकारी न मानी खरा । नम्र होऊन करी मुजरा । तो कां त्या सोंगास ॥ ६८२ ॥ तैसेंच त्या वेषापरी । अवतार घेऊन येतो हरी । म्हणून अवताराची भक्ती खरी । केल्या पराच होतसे ॥ ६८३ ॥ आतां भूप नसून राजाचें । जो सोंग आणी साचें । त्याचें न ऐसें व्हावयाचें । कौतुक तें केव्हांही ॥ ६८४ ॥ म्हणून अवतारी पुरुषास । जाणून केल्या भक्तीस । तीही होईल खास । पराभक्तीच विबुध हो ॥ ६८५ ॥

जन्मकर्मविदश्चाजन्मशब्दात् ॥ ४७ ॥

जन्म या शब्देंकरून । रामकृष्णादि अवतार जाण । करणें आहे ग्रहण । वा इतर देवता ॥ ६८६ ॥ कर्माचा अर्थ येणें रिती । ज्या पुरुषाची करी कृती । दुष्टाचें हनन निश्चिती । आणि पालन सज्जनांचें ॥ ६८७ ॥ या दोहींचें ज्ञान । झालें आहे ज्यालागून । तो मोक्षाधिकारी पूर्ण । होतो ऐसें गीता म्हणे ॥ ६८८ ॥ जन्म कर्म च मे दिव्यं । ऐसें बोलला पुरुषोत्तम । जो कृष्ण परंधाम । नवव्या अध्यायामाझारीं ॥ ६८९ ॥ जन्मकर्में ईश्वराचीं । अमानुष स्वरूपाचीं । म्हणून त्या जन्मकर्मांची । जाणीव होणें हेंच ज्ञान ॥ ६९० ॥ आणि तें झालेलें ज्ञान । करी पराभक्ती उत्पन्न । त्या पराभक्तीपासून । मोक्ष मिळे रोकडा ॥ ६९१ ॥

तच्च दिव्यं स्वशक्तिमात्रोद्भवात् ॥ ४८ ॥

रामकृष्णादि अवतारी । हेही इतर देहधाऱ्यांपरी । मग

त्यांची भक्ती कोठून तरी । परा होऊं शकेल ॥ ६९२ ॥ ऐशी कोणी घेतील शंका । त्याचें उत्तर यांत देखा । आतां सूत्राचा अर्थ ऐका । या अठ्ठेचाळीसाव्याचा ॥६९३॥ अवतारी पुरुषाचे । देह ना भौतिक स्वरूपाचे । ते झाले आहेत साचे । खास ईश्वरी मायेपून ॥ ६९४ ॥ नरसिंह स्तंभीं प्रगटला । वा वामन घटकेंत विकट झाला । वा श्रीकृष्ण उभा राहिला । अष्ट वर्षांचा देवकी-पुढें ॥ ६९५ ॥ स्तंभामाजीं प्रगट होणें । वा एक्या पदीं भूमी व्यापणें । वा जन्मतांच उभे राहणें । आठ वर्षांचें होऊन ॥६९६॥ हें सृष्टिधर्माविरुद्ध । सर्वत्र आहे प्रसिद्ध । परी तेथें आहे संबंध । त्या ईश्वरी मायेचा ॥ ६९७ ॥ ज्या मायेची अगाध शक्ती । कांहीं ना अशक्य तिजप्रती । हें ध्यानांत धरून निश्चिती । अव-तारी पुरुष मानणें ॥ ६९८ ॥ आतां अवताराचें कारण । इतुकेंच आहे जाण । सज्जन सत्पथा रक्षून । अनीती दुष्ट संहारणें॥६९९ तें प्रत्यक्ष क्रिया केल्याविना । कळून येणार नाहीं कोणा । आणि नीतिबंधनास बळकटपणा । त्यावांचून नये कीं ॥ ७०० ॥ पहा मातला दशानन । लंकाधिपति रावण । त्याचें साधावया मरण । ईश झाला राम पहा ॥ ७०१ ॥ त्या दुष्ट रावणासी । कांहीं न करितां समुद्रासी । आलें असतें निश्चयेंसी । बुडवितां त्या ईशातें ॥ ७०२ ॥ परी दुष्ट कृतीला । वा अशास्त्र कर्माला । गती कोणती ही जगाला । कळलें नसतें निःसंशय ॥ ७०३ ॥ म्हणून अवतार धरून । सन्नीतीला वाढवून । पद्-नताचें संरक्षण । करून वधिलें रावणाला ॥ ७०४ ॥ परस्त्री-हरणें काय होतें । हें दाविलें जगतातें । अपराधवृक्षा कोणतें । येतें फळ हें दाविलें जगास ॥ ७०५ ॥ कां कीं ज्यासी नीती शिक्षण । देणें आहे आवर्जून । झालें पाहिजे त्यासमान । शिक्ष-काला प्रथमता ॥ ७०६ ॥ श्रीतुका ज्ञानजेठी । बोलला लेंकराचे साठीं । पंतें धरिली हातीं पाटी । तो अभंग पहावा ॥ ७०७ ॥ अवतारी पुरुष निश्चिती । सामान्याप्रमाणें दिसती । परी जग-व्यवहाराची तेथें न व्याप्ती । ते सर्वदा अलग त्यापून ॥ ७०८ ॥ अवतारी चरित्राकारणें । पाहणें न वांकड्या दृष्टीनें । हेंच सांगण्या कारणें । कथिलें आहे हें सूत्र ॥ ७०९ ॥

## मुख्यं तस्य हि कारुण्यम् ॥ ४९ ॥

सृष्टीविषयीं प्रवृत्त । जो हा झाला ईश सत्य । त्याचें कारण हेंच खचित । तो मूळचा दयार्द्र हें ॥ ७१० ॥ ईश्वरासम दयाळू । ईश्वरासम कृपाळू । ईश्वरासम मायाळू । आन कोणीच नसे कीं ॥ ७११ ॥ म्हणून जगाचें करण्या कल्याण । नाना अवतार करी धारण । आपुलें तें दयार्द्रपण । टिकवावयाकारणें ॥७१२॥ श्रोते या सूत्रावरून । एक्या शंकेचें होतें जनन । त्या शंकेचें अवलोकन । करूं आतां थोडेसें ॥ ७१३ ॥ साधूंचें तें पालन । दुर्जनाचें हनन । या दोन क्रियांवरून । विषमक्रियाकारी तो ॥ ७१४ ॥ ही सृष्टीची रचना । हाच त्याचा निष्ठुरपणा । भोगवी नाना यातना । विविध जीवाकारणें ॥ ७१५ ॥ सृष्टि जेव्हां नव्हती । तेव्हां जीवाची जीवस्थिती । समरस होऊन राहिली होती । निव्वळ ब्रह्मस्वरूपांत ॥ ७१६ ॥ म्हणजे आनंद-मय ब्रह्म होतें । दुःखशोकासी स्थान नव्हतें । आणि कोणत्याही विकारातें । जागा नव्हती ते ठायीं ॥ ७१७ ॥ संपत्ती अलोट ज्याच्या घरीं । त्यालाच मागण्या माधुकरी । या ईशानें लाविली खरी । मग तो दयाळू सांगा कसा ॥ ७१८ ॥ जो भोगीत होता उंच माडी । त्यालाच ईशानें झोंपडी । जो खात होता साखर खडी । त्यालाच दिलें माडगें ॥ ७१९ ॥ ऐसें ज्याचें कर्तृत्व । क्रूरपणाचें अत्यंत । त्यालाच म्हणणें कां शोभत। परमदयाळू म्हणोनियां ॥ ७२० ॥ ईशें निजशक्ती वेंचिली । क्रूर कर्मे करण्या भली । सृष्टीचिया प्रलयकालीं । अवघें संहारी ईश हा ॥ ७२१ ॥ प्रलयकालीचें क्रूरपण । या ईशाचें करी ताण । अवघ्यांहून आगळें जाण । उपमेसीही जागा नसे ॥ ७२२ ॥ पहा या पृथ्वीवर । नृप झाले परम क्रूर । त्यांनीं कत्तली अपार । केल्या बळें आपुल्या ॥७२३॥ त्यांचीं नांवें इति-हासांत । क्रूर जुलमी अत्यंत । यांत विशेषणें मंडीत । झालीं आहेत पहा ते ॥ ७२४ ॥ त्यांचें तें क्रूर कृत्य । पासंगासही नाहीं पुरत । या ईशाच्या बुध हो खचित । प्रलयकालच्या क्रूरतेला

॥ ७२५ ॥ म्हणून हा ईश्वर । निष्ठुर तैसा परमक्रूर । लवही दयेचा पाझर । ईशाठायीं दिसेना ॥ ७२६ ॥ ऐसी जरी शंका । उत्थान पावे येथ देखा । तरी ती निरर्थक ठेवूं नका । विश्वास त्या शंकेवरी ॥ ७२७ ॥ सुखदुःखात्मक जग भलें । प्रकृतीच्या साह्यें निर्मिलें । ज्यानें जें जें कर्म केलें । त्याचें फळ तें दिलें तया ॥ ७२८ ॥ हा ईश्वराचा न्यायीपणा । म्हणून त्या ना कठोर म्हणा । न्यायाधीशाचें उदाहरण आणा । मनामाजीं म्हणजे कळेल ॥ ७२९ ॥ एकें एकाचा खून केला । तो खुनी मनुष्य फांशीं दिला । न्यायाधिशानें हा कां केला । सांगा त्यानें अपराध ॥ ७३० ॥ येथें मनुष्याचें हनन । केल्या दोषीपणाचें लक्षण । ज्यानें आहे केला खून । तो त्यानें एकाचा ॥ ७३१ ॥ परी जो कां न्यायाधीश । हजारों खुनी मनुष्यांस । चढवीतसे फांसास । म्हणून कां तो क्रूर होय ॥ ७३२ ॥ न्यायाधीशाकारणें । अपराध्यास शिक्षा देणें । निःस्वार्थीपणानें । भाग आहे विबुध हो ॥ ७३३ ॥ तैसें न करील जरी । बलाढ्य होतील दुराचारी । त्यांचें साम्राज्य झाल्यावरी । कोण विचारतो नीतीला ॥ ७३४ ॥ खून कर्ता जो कां खुनी । आपुला स्वार्थ साधण्याजाणीं । करी इतरांची प्राणहानी । तैसें न न्यायाधिशाचें॥७३५॥ न्यायाधीशाची ही कृती । जगकल्याणा निश्चिती । म्हणून त्या तीळरती । बाधक ना होतसे ॥ ७३६ ॥ गीतेच्या चतुर्थ अध्यायांत । त्यक्त्वा कर्म या श्लोकांत । हेंच सांगे भगवंत । तें पहा विबुध हो ॥ ७३७ ॥ आसक्ती कर्मफलाची । ठेवितां न लव साची । कर्में स्वकर्तव्याचीं । जो कां चोख करीतसे ॥ ७३८ ॥ तयाला त्याची बाधा । होणार नाहीं पहा कदा । म्हणून त्या सच्चिदानंदा । क्रूर म्हणतां मुळींच नये ॥७३९॥ ईश्वर कर्मांचा फलदाता । तो नोहे कर्मकर्ता । म्हणून कर्मकर्त्याची स्वतंत्रता । कायम म्हणावी लागेल कीं ॥ ७४० ॥ या एक्या गोष्टीनें । ईश्वर स्वातंत्र्याकारणें । भाग आहे बाधित होणें । त्याची वाट लागे कशी ॥ ७४१ ॥ परी ईश्वराचें स्वातंत्र्य । आहे त्रिकालाबाधित । तें कशानेंही न होत । बाधित पहा विबुध हो ॥ ७४२ ॥

तीस एकतिसाच्या ठायीं । जीवात्म्याचा खुलासा पाहीं । ईश्वर कर्मकर्ता नाहीं । फक्त त्याचा साक्षी असे ॥७४३॥ रजतमात्मक बुद्धीपरी । जीव हा कर्म करी । त्याचीं फळेंही साजिरीं । ईश-साक्षित्वें भोगी जीव ॥ ७४४ ॥ म्हणून ईश आणि ईशअवतार । यांचा जगत्संबंध साचार । कारुण्यमय आतां फार । बोलणें येथें मुळीं नको ॥ ७४५ ॥ म्हणून जीवाचें जीवपण । हरावया कारण । पराभक्तीचें साधन । वेदद्वारां निर्मिलें ॥ ७४६ ॥ रचना या सृष्टीची । बीजांकुराप्रमाणें साची । ती कधीं ना यावयाची। करणें खंडित कवणाला ॥ ७४७ ॥ पहा ऋग्वेदसंहितेंत । 'धाता यथा' या मंत्रांत । विधाता कैसी रचित । सृष्टी ते कथन केली ॥७४८॥ एवं च दयाळू हाच आहे परम । सच्चिदा-नंद पुरुषोत्तम । निर्विकारी आरामधाम । कैवल्यकंद निवळ हा ॥ ७४९ ॥ त्या ईशाच्या प्राप्तीसाठीं । करणें पराभक्तीच्या खटपटी । हीच गोष्ट शेवटीं । सिद्ध झाली विबुध हो ॥ ७५० ॥

## प्राणित्वान्न विभूतिषु ॥ ५० ॥

ईश्वराच्या विविध विभूती । शास्त्रामाजीं कथिल्या असती । त्या विभूतींची केल्या भक्ती । फळ मोक्षाचें मिळेना ॥ ७५१ ॥ कां कीं प्राणिकोटींत । विभूति ह्या येतात । त्यांची भक्ति न देऊं शकत । मोक्ष मानवांकारणें ॥ ७५२ ॥ मोक्षाप्रती देणारा । एक ईशचि आहे खरा । त्याचें साधन भक्ती परा । हें केव्हांही विसरूं नका ॥ ७५३ ॥ गीतेच्या दशमाध्यायांत । ज्या विभूति कथिल्या अर्जुनाप्रत । त्या विभूतींची केल्या होत । भक्ती गौण स्वरूपाची ॥ ७५४ ॥ तेथें विभूती सांगण्याचें । कारण विचारें हेंच साचें । विशेषत्व ईशाचें । आहे कसें हें दावावया ॥७५५॥ मानवांमाजी भूपती । नद्यांमाजी भागीरथी । हिमाचल अवघ्या पर्वतीं । ऋषिवरांत भृगू तो ॥ ७५६ ॥ जुगारामाजी द्यूत । कालकूट अवघ्या विषांत । वासुकी तो सर्पांत । ऐसें जरी कथन केलें ॥ ७५७ ॥ तें विशेषत्व दावावया । कथन केलें त्या ठाया । याचा पोक्त करूनियां । विचार पहा मानसीं ॥ ७५८ ॥ म्हणजे

येईल कळोन । हें विभूतींचें पूजन । न होय मोक्षाचें साधन । याचाच उहापोह पुढतीं असे ॥ ७५९ ॥

द्यूतराजसेवयोः प्रतिषेधाच्च ॥ ५१ ॥

भूपती आणि द्यूत । हे जरी विभूतींत । परी भक्ती करण्याप्रत । अयोग्य हे सर्वदा ॥ ७६० ॥ म्हणून राजसेवा आणि जुगार । त्याज्य आहेत साचार । यानें न कदा होणार । उद्धार तो जीवाचा ॥ ७६१ ॥ श्रोते हें राजपण । मुळींच अनीतीचें आहे खाण । निज स्वार्थावांचून । कांहीं न दिसे भूपातें ॥ ७६२ ॥ म्हणून सेवा राजाची । त्याज्य कथिली आहे साची । संगत घडतां तस्कराची । तोही तस्कर होय पुढें ॥ ७६३ ॥ भूपतीचें मोठेपण । सागराचें समान । सागराठायीं आहे वाण । पिण्या योग्य उदकाची ॥ ७६४ ॥ म्हणून राजसेवा करूं नये । मोह तिचा धरूं नये । सत्पथापून ढळूं नये । साधकानें यत्किंचित् ॥ ७६५ ॥ श्रोते ऋग्वेदसंहितेला । सूर्य आहे सांगता झाला । तूं टाकोनि द्यूताला । अभ्युदयार्थ शेती करी ॥ ७६६ ॥ शेतीचिया योगेंकरून । जीवांचें होय संगोपन । आणि कर्त्यालाही द्रव्यार्जन । करितां तें येईल कीं ॥ ७६७ ॥ या सूर्याच्या म्हणण्याचा । मथितार्थ हाच साचा । जो का धंदा करावयाचा । तो परोपकारी असावा ॥ ७६८ ॥ राजसेवा आणि द्यूतांत । परोपकार ना यत्किंचित् । म्हणून दोहींचा शास्त्रांत । निषेध आहे सांगीतला ॥ ७६९ ॥ जो खरा-खरा विचारी । तो राजसेवा कधीं न करी । वा द्यूताचें अंतरीं । प्रेम त्याच्या येत नसे ॥ ७७० ॥ याच अर्थाचा सिद्धांत । आहे मनुस्मृतींत । तस्मात द्यूतं न सेवेत । हा स्वार्थमपि बुद्धिमान ॥ ७७१ ॥ एवंच या सगळ्या विभूति । साक्षात् ईश्वर ना निश्चिती । हेंच शांडिल्य सांगती । या सूत्राच्या आधारें ॥ ७७२ ॥ आतां वासुदेव मी यादवांत । ऐसें बोलला भगवंत । यावरून तोही ठरत । सामान्य विभूति श्रोते हो ॥ ७७३ ॥ मग त्या

वासुदेव कृष्णाची । भक्ती कधीं ना व्हावयाची । मोक्षदायी सुखद साची । ऐसें म्हणावें लागेल ॥ ७७४ ॥ याच्या उत्तरा-प्रीत्यर्थ । बावन्नावें आहे सूत्र । तें आणा विचारांत । म्हणजे उलगडा होईल कीं ॥ ७७५ ॥

वासुदेवेपीति चेन्नाकारमात्रत्वात् ॥ ५२ ॥

मुगुटमणी यादवांचा । पुत्र वसुदेवदेवकीचा । वासुदेव नांवाचा । विभूतिन्याय त्याला नसे ॥ ७७६ ॥ कां कीं देह कृष्णाचा । नोहे भौतिकस्वरूपाचा । तो मायामयी साचा । हें त्याचेंच चरित्र सांगत ॥ ७७७ ॥ बारा गांव अग्नी गिळणें । वा अंगुलाग्रीं पर्वत धरणें । क्षणांत लहानमोठें होणें । हें भौतिक देहा न साधे कधीं ॥ ७७८ ॥ तो मानव वेषधारी । परी मनुष्य नव्हता निर्धारीं । माया लाघवी श्रीहरी । साक्षात् ब्रह्मचि केवळ ॥ ७७९ ॥

प्रत्यभिज्ञानाच्च ॥ ५३ ॥

पूर्व ओळखीवरून । साक्षात ब्रह्म हा श्रीकृष्ण । ऐसें म्हणाया लागून । आधार बड्या ज्ञात्यांचा ॥ ७८० ॥ भगवान् मार्कंडेय मुनी । सांगती धर्मालागुनी । जो प्रलयकालीं पाहिला नयनीं । तोच हा साक्षात श्रीकृष्ण ॥७८१॥ तोच हा ज्ञानजेठी । जगत्कल्याणासाठीं । आला वसुदेवाचे पोटीं । म्हणूनि म्हणती वासुदेव ॥७८२॥ शरीरधर्म मानवापरी । याचे नाहींत निर्धारीं । पुरुष जे कां अवतारी । ते कामरूप सर्वथा ॥ ७८३ ॥ भक्ती कराया कारण । वासुदेव योग्य म्हणून । ऐशा परीचा नाहीं गुण । इतर विभूतींच्या ठायीं ॥ ७८४ ॥

वृष्णिषु श्रेष्ठ्येन तत् ॥ ५४ ॥

वृष्णीनां वासुदेवोस्मि ऐसें । जें दशमाध्यायीं कथिलें असे । त्याचा मथितार्थ ऐसा असे । तो आतां श्रवण करा ॥ ७८५ ॥

यादवाचे कुलांत । अवतीर्ण झाले भगवंत । म्हणून अवघ्या यादवांत । श्रीकृष्ण हें कथन केलें ॥ ७८६ ॥ अर्थानुरोधें भलें । विभूति त्या मानिलें । यादवांनीं नाहीं केलें । श्रेष्ठ त्या कृष्णाला ॥७८७॥ उलट कृष्णानें यादवांसी । चढाविलें आहे लौकिकासी । जैंवीं मृगमदानें मृत्तिकेसी । श्रेष्ठपणा आणावा ॥ ७८८ ॥

एवं प्रसिद्धेषु च ॥ ५५ ॥

यावरून पुराणांतरीं । जे जे कथिले अवतारी । मच्छ कच्छ वराह नरहरी । वामन परशुराम राम ते॥७८९॥ वसुदेवाचा नंदन। भगवान् श्रीगोपालकृष्ण । बौद्ध आणि कलंकी जाण । हे पुरुष अवतारी ॥७९०॥ या अवतारी पुरुषांपरी । दत्त मार्तंड त्रिपुरारी। हेही देव निर्धारीं । अवतारीच मानावे ॥७९१॥ अवघे अवतारी पुरुष । धरिती जरी मनुजवेष । परी अधिकार दाविती विशेष। आपुल्या ठायीं असलेला ॥ ७९२ ॥ आकार भव्य धारण केला । आणि स्तंभामाजीं प्रगटला । हें जगाच्या राहटीला । विरुद्ध आहे सर्वांशीं ॥७९३॥ ऐसीं अघटीत कृत्यें तीं । ज्यांच्या चारित्रीं दृष्टी पडती । तेच अवतारी निश्चितीं । बाकीचीं तीं सर्व सोंगें ॥ ७९४ ॥ म्हणून अवतारी पुरुषांची । भक्ती ती केल्या साची । तिलाच योग्यता परेची । येऊन मोक्ष मिळे ॥ ७९५ ॥ असो आतां येथवरी । पराभक्ती वर्णिली खरी । आणि तिचीं कथिलीं सारीं । प्रधान अंगें ज्ञानादिक ॥ ७९६ ॥ परा भक्ती प्रतिबंधक । जीं पातकें असती देख । त्याचा करूनि निःशंक । नाश तो सर्वांशीं ॥७९७॥ आणि ती सोंवळी पराभक्ती । दृढतर करण्या-प्रती । सांगणार आहेत पुढती । गौणी भक्तीचें साधन ॥ ७९८ ॥ पातकांचें हरण । गौणी भक्तीनें होय जाण । म्हणून तिचें मोठेपण । सूत्रकारें मान्य केलें ॥ ७९९ ॥ त्या गौणी भक्तीचें । रूपांतर परेंत साचें । कैंवीं रिती व्हावयाचें । तें येथून अवधारा ॥ ८०० ॥

( द्वि. अ. समाप्त. )

---

भक्त्या भजनोपसंहाराद्गौण्यापरायैतद्धेतुत्वात् ॥ ५६ ॥

भजनात्मक भक्ती गौणी । पराभक्तीस हेतु जाणी । याच मूळापासुनी । पराभक्ती हा वृक्ष होतो ॥ ८०१ ॥ मूळ असल्या-वांचून । वृक्षासी ना वृक्षपण । मूळ पाहिल्या शोधून । तेथें कशाचा पत्ता नसे ॥ ८०२ ॥ म्हणजे श्रोते मुळाठायीं । पानफूल ना दिसे कांहीं । अंतिमसाध्य फल तेंही । मुळाठायीं दिसेना ॥ ८०३ ॥ परी पानफूल निर्मिण्याची । शक्ती मुळामध्यें साची । मूळें शुद्ध जयाचीं । त्या वृक्षांना ना भिरूड लागे ॥ ८०४ ॥ या गौणी भक्तीचे प्रकार । कथिले आहेत सविस्तर । नवव्या अध्यायीं साचार । भगवद्गीता ग्रंथाच्या ॥ ८०५ ॥ भजन आणि पूजन । यजन आणि चिंतन । यांचे ठायीं असल्या जाण । सकामत्व ती गौणी ठरे ॥ ८०६ ॥ मात्र हे बिगारीचे । प्रकार नसावे अंशीं साचे । प्रेम ईश्वराविषयींचें । अलोट पाहिजे अंतरीं ॥ ८०७ ॥ सकामत्व गेल्यावरी । तीच परा होते खरी । गार शुद्ध झाल्यावरी । तीच कांच होतसे ॥ ८०८ ॥

रागार्थप्रकीर्तिसाहचर्याच्चेतरेषाम् ॥ ५७ ॥

ईशाची अगाध शक्ती । तीच त्याचें माहात्म्य वा कीर्ती । ही साधकाच्या ठसतां चित्तीं । मन त्याचें उचंबळतें ॥ ८०९ ॥ मग तयाला वाट फुटे । तेंच कीर्तन गोमटें । तेंच गायनाच्या वाटे । वाहूं लागे प्रवाहवत् ॥ ८१० ॥ तें प्रवाहरूप कीर्तनवारी । मिळे प्रेमाच्या सागरीं । ऐसी स्थिति झाल्यावरी । अनुभव तो येतसे ॥ ८११ ॥ भजन पूजन याजन । नमन चिंतन कीर्तन । या गौणी भक्ती म्हणून । जरी असल्या ख्यात जगीं ॥ ८१२ ॥ तरी याच भक्तींची वाढ होतां । पराभक्ती येत हातां । परा-

भक्ती प्रथमता। साधणें मोठें दुर्घट ॥ ८१३ ॥ ती साध्य व्हाया कारण। या गौणी भक्तीचें प्रयोजन। जैसें तारुण्यालागून। बालपणाची अपेक्षा ॥ ८१४ ॥

अंतराले तु शेषाः स्युरुपास्यादौ च काण्डत्वात् ॥ ५८ ॥

शेष जे राहिले इतर। गौणी भक्तीचे प्रकार। त्यांच्याही द्वारें साधणार। आहे बुध हो पराभक्ती ॥ ८१५ ॥ या गौणी भक्तीचे। प्रकार नानाविध साचे। एकमत कोणाचें। नाहीं शास्त्रें शोधितां ॥८१६॥ परी अवघ्या प्रकाराचें। स्वरूप एकचि साचें। तेथें कधीं न व्हावयाचें। कोणाचेंही दुमत ॥ ८१७ ॥ ही आचराया भक्ती गौणी। इतक्या गोष्टी अवश्य जाणी। त्या असल्यावांचूनी। गौणी भक्ती रूपा नये ॥ ८१८ ॥ यत्न पाहिजे अति थोर। कडकडीत वैराग्य साचार। पाहिजे भरिलें अंतर। दया आणि क्षमेनें ॥ ८१९ ॥ स्वैर व्यापार इंद्रियांचे। आवरणें आधीं साचे। बा रे अजादुजाचें। लागूं नये यत्किंचित ॥ ८२० ॥ विश्वास पाहिजे दृढतर। निमाला पाहिजे मत्सर। न उठावा अहंकार। कोणत्याही कृत्याचा ॥ ८२१ ॥ छांदोग्य उपनिषदामाझारीं। क्रम आहे याचपरी। उपासना नानापरी। एकेक प्रथम कथन केल्या ॥ ८२२ ॥ मनो ब्रह्मेत्युपासीत। हें छांदोग्य सांगत। गीताही ऐसेंच वदत। या गौणी भक्तीविषयीं ॥ ८२३ ॥ पराभक्तीस येणारे। अडथळे गौणी वारी खरे। यावांचून तिला दुसरें। फळ नाहीं विबुधहो ॥ ८२४ ॥ कितीही असो अनधिकारी। गौणी भक्ती तया करी। मोक्ष साधण्या अधिकारी। ऐसा प्रभाव तियेचा ॥ ८२५ ॥ 'अपि चेत्' या श्लोकांत। हेंच सांगे भगवंत। मंदाधिकारी समस्त। जाती याच वाटेनें ॥८२६॥ ही गौणी भक्ती वाट मोठी। पराभक्तीच्या जाय पेठीं। या गौणी भक्तीस आटाआटी। नाहीं मुळींच ज्ञानाची ॥ ८२७ ॥ गौणी भक्तीचे बरोबरी। ज्ञान उपजूं लागे अंतरीं। चित्तशुद्धी तचि करी। स्वानुभवातें देऊन ॥ ८२८ ॥

## ताभ्यः पावित्र्यमपाक्रमात् ॥ ५९ ॥

या गौणी भक्तीच्या सेवनें । शुद्ध होतीं अंतःकरणें । चित्त शुद्ध झाल्याविणें । उपयोग ना कशाचा ॥ ८२९ ॥ वस्त्रपात्रांची मलीनता । जल हरितें तत्त्वतां । तेवीं गौणी भक्तीची योग्यता । जलापरी विबुध हो ॥८३०॥ प्रापंचिकाचें चित्त । रजतमें असे व्याप्त । म्हणून त्यांचा अवघा हेत । कर्मं करण्याकडे असे ॥ ८३१ ॥ कर्मार्जित पुण्यासी । मोक्ष नोहे निश्चयेंसी । कर्माचरणें चित्तासी । समाधान होणें नसे ॥ ८३२ ॥ श्रोते अंतःकरणांत । जेव्हां सत्त्व गुण वाढला जात । तेव्हांच विकल्परहित । चित्त होतें सोंवळें ॥ ८३३ ॥ सत्त्व गुण वाढविण्यासी । उपाय योगशास्त्रासी । नानाविध प्रकारेंसी । कथन केलें आहे ॥ ८३४ ॥ तीं साधनें योगाचीं । या भयंकर कालीं साचीं । लोपून गेलीं कायमचीं । हाय हाय रे दुर्दैवा ॥ ८३५ ॥ असो अंतःकरणाठायीं । जेव्हां रजतमात्मक वृत्ती पाहीं । उत्थान पावल्या जाती तई । साधकें ऐसें करावें ॥ ८३६ ॥ ज्या वृत्तींत गुंतलें मन । त्याविरुद्ध वृत्ती निर्माण । चित्तीं करावी यत्नेंकरून । जोरदार परम ऐसी ॥ ८३७ ॥ म्हणजें पहिल्या वृत्तीचा । कमजोर होऊन साचा । प्रवेश सत्त्व गुणाचा । अंतःकरणीं होईल ॥ ८३८ ॥ तो सत्त्वगुण वाढल्यावरी । विवेक उपजेल अंतरीं । मग ज्ञानाचिया मंदिरीं । प्रवेश त्याचा होईल ॥ ८३९ ॥ या कृतीलागून । आहे गीतेचें प्रमाण । सत्त्वात् संजायते ज्ञानं । अवलोकन तें करा ॥ ८४० ॥ ती सत्त्ववृत्ति दृढ व्हाया । गौणी भक्तीच्या उपाया । कथन केलें शास्त्राठाया । ज्ञात्या पूर्वाचार्यांनीं ॥ ८४१ ॥ म्हणजे सत्त्ववृत्ति झाल्या दृढ । ज्ञानाची ती होते वाढ । मग तया न उरे कांहीं जड । पराभक्ती साधावया ॥ ८४२ ॥

## तासु प्रधानयोगात्फलाधिक्यमेके ॥ ६० ॥

काांहीं आचार्यांचें मत । ऐशापरी आहे सत्य । पराभक्तानें आचरणांत । ह्या गौणी भक्ती आणाव्या ॥ ८४३ ॥ म्हणजे पराभक्ताकारण । या गौणी भक्तीच्या योगें जाण । सामान्यशा जनांहून । अधिक फळ मिळेल कीं ॥ ८४४ ॥ या दोहींचा विचार करितां । सिद्धांत नये ठरवितां । कां कीं पराभक्ती करण्याकरितां । क्रियेची ना जरूर कांहीं ॥ ८४५ ॥ क्रियात्मक भक्ती गौणी । त्या भक्तीच्या सेवनीं । मोक्ष तो ना मिळे जाणी । तो अधिकार परेचा ॥ ८४६ ॥ श्रोते पराभक्तीचा । धर्म विशेष प्रकारचा । तेथें या गौणभक्तीचा । प्रकार मुळींच लंगडा पडे ॥ ८४७ ॥

## नाम्नेति जैमिनिः संभवात् ॥ ६१ ॥

श्रीजैमिनीला वरील मत । मुळींच नाहीं संमत । ते म्हणती परंत । मिळविणें कांहीं न राहिलें ॥ ८४८ ॥ विषय पराभक्तीचा। ईश्वर हा एकचि साचा । तेथें नाहीं उरायाचा । भक्ती करणारा पृथक्पणें ॥ ॥ ८४९ ॥ पराभक्तीचें लक्षण । ईश्वराशीं तादात्म्य होणें । तेथें अन्य विषयालागून । जागाच मुळीं उरत नसे ॥८५०॥ मग गौणी भक्तीच्या सेवनें । काय आहे त्या मिळविणें । काय सांगा भूपतीनें । इच्छावें त्या दिवाणपदा ॥ ८५१ ॥ श्रोते गौणी भक्तीनें । पराभक्ती उत्पन्न करणें । म्हणून गौणीचीं साधनें । मागें कथन केलींत कीं ॥ ८५२ ॥ आतां पराभक्तानें । जी गौणी भक्ती सेवणें । ती फलाच्या आशेनें । करणें नाहीं मुळींच ॥ ८५३ ॥ ती ती पुढीलाकारणें । करावयासी शाहणे । आहे धडा घालणें । ऐसें विचारें वाटत ॥ ८५४ ॥

## अत्रांगप्रयोगानां यथाकालसंभवो गृहादिवत् ॥ ६२ ॥

पराभक्तीस साधनभूत । जी गौणी भक्ती खचित । ती तिच्या अंगांसहित । तारतम्यें आचरावी ॥ ८५५ ॥ म्हणजे

यथाकाल यथाशक्ती । आचरावी गौणी भक्ती । लक्ष ठेवून निश्चिती । साध्यशा पराभक्तीवर ॥ ८५६ ॥ बहुतांनीं बहुत प्रकारचीं । साधनें या गौणी भक्तीचीं । कथन केलीं आहेत साचीं । विधी त्यांचे ठरवून ॥ ८५७ ॥ पहा पूजाभक्तीचे प्रकारांत । क्रम कथिला आहे सत्य । त्यांत होतां विपरीत । प्रायश्चित्तही कथन केलें ॥ ८५८ ॥ हे विधि अविधी ठरविण्याचा । खटाटोप शब्दांचा । त्या खटाटोपाचा । लाग न पराभक्तीमध्यें ॥ ८५९ ॥ ज्यास गौणीभक्तीपून । कांहीं मिळविणें असें जाण । त्यानें सशास्त्र कर्माचें आचरण । केलेंच पाहिजे फलास्तव ॥ ८६० ॥ पराभक्तीचे ठायीं । फलाचें नांवही नाहीं । ती साधण्याकरितां पाहीं । पूजन हें साधन ज्याचें ॥ ८६१ ॥ ऐशा त्या पूजकास । विधि अविधीचा नाहीं दोष । तेथें प्राधान्य अनन्यतेस । सर्वांशीं आहे विबुध हो ॥ ८६२ ॥ जो का अनन्य होतो नर । ईश्वराठायीं साचार । विधिअविधींचा विसर । पडूं लागे तयाला ॥ ८६३ ॥ त्याला साध्य एक ईश्वर । कांहीं न उरे इतर । तो अवघें चराचर । ईशाचि मानी ॥ ८६४ ॥ विधि तरी ईश्वर । अविधि तोही ईश्वर । विधि अविधीचे प्रकार । निराळे तो मानीचना ॥ ८६५ ॥ अनन्यतेनें तो जें करी। तें सशास्त्र सर्वतोपरी । चंद्रहासानें मुखाभीतरीं । शालिग्राम ठेविला ॥ ८६६ ॥ आतां केवळ शास्त्राची । पायमल्ली करण्या साची । योजना अविधी कृत्याची । केल्यास तें घोर पाप॥८६७॥ म्हणून सशास्त्र पूजन करावें । विधीला न महत्त्व द्यावें । अवधान अवघें असावें । पराभक्ती साधण्यास ॥ ८६८ ॥ या कीर्तनभक्तीचा । विधी मुळींच नाहीं साचा । तोच नामस्मरणाचा । धर्म आहे विबुध हो ॥ ८६९ ॥ पहा ज्यास बांधणें घर । तो क्रमाचा न करी विचार । सोईप्रमाणें साचार । सामान खरेदी करीतसे ॥ ८७० ॥ लांकूड धोंडा विटा चुना । हे सोयीप्रमाणें घेवो जाणा । वा एकदम अवघ्या सामाना । तो खरेदी करो कीं ॥ ८७१ ॥ या सामान घेण्यांत । क्रमाचें ना महत्त्व । हें आणून ध्यानांत । गौणी भक्ती आचरावी ॥ ८७२ ॥ आतां पहा

घरासी । अवघेंच पाहिजे त्यासी । तैंवी या पराभक्तीसी।साधनें अवघींच पाहिजेत ॥ ८७३ ॥ ऐसें जरी आहे खरें । तरी येथें एक शंका उरे । सामान सिद्ध असल्या सारें । घर बांधतां येईल ॥ ८७४ ॥ तें बांधितां वेळीं परी । क्रमाची आवश्यकता आहे खरी । पाया बांधण्या आरंभ करी । बांधणारा प्रथमतां ॥८७५॥ तो एक भरल्यावरती । बळदें आणि जोतें भिंती । खोल्या माड्या पुढतपुढती । कितीतरी प्रकार त्याचे ॥ ८७६ ॥ म्हणून पद्धतीप्रमाणें क्रमवार । अवश्य आहे बांधणें घर । क्रमांत झाल्या संकर । बांधकामाचा घोंटाळा ॥ ८७७ ॥ आतां गृहाचें प्रयोजन । केवळ आश्रयासाठीं जाण । तें नुसतें पाल ठोकून । साधितां साच येईल कीं ॥ ८७८ ॥ परी आश्रय पालाचा । क्षणैक आहे साचा । पर्जन्यकाळीं टिकाव त्याचा । न लागेल यत्किंचित् ॥ ८७९ ॥ तेथें अवश्य आहे सदन । सर्व ऋतूंत होय रक्षण । हें मनांत आणून । गौणी भक्ती सांगीतल्या ॥ ८८० ॥ गौणी भक्तीनें ऐहिक मिळे । पराभक्तीनें ईश कळे । आणि जन्म-मृत्यूची ती टळे । आपत्ती या जीवाची ॥ ८८१ ॥ पालाच्या आश्रयासी । संकटें तीं बहुवसीं । वावटळ उठतां आकाशीं । पालें जातीं उडोन ॥ ८८२ ॥ वा सुटतां झंझावात । पाल न टिके यत्किंचित् । तैसी पर्जन्यकाळांत । दैनाच त्याची सर्वस्वीं ॥ ८८३ ॥ म्हणून घर बांधणें बरें । पाल बांधण्यापेक्षां बा रे । वृक्ष छाया हेंही नुरे । खटपट पाल बांधण्याची ॥ ८८४ ॥ वृक्ष, पाल आणि घर । हे आश्रयाचे प्रकार । येथें सर्वतोपरी साचार । घर हेंच उत्तम ठरे ॥ ८८५ ॥ गौणी भक्तीद्वारें म्हणून । जी पराभक्ती होय उत्पन्न । त्याच भक्तीचें चांगुलपण । दोन्ही ठिकाणीं कामा ये ॥ ८८६ ॥ म्हणून ईश्वरप्राप्ती जोंवरी । झाली नाहीं तोंवरी । या साधनाची महती खरी । मानणें आहे भाग पहा ॥ ८८७ ॥

## ईश्वरतुष्टेरेकोऽपि बली ॥ ६३ ॥

संतुष्ट झाल्या ईश्वर । त्यास कशाचाही नाहीं दर । त्याला अशक्य ऐसें तिळभर । कांहीं नसें राहिलें ॥८८८॥ म्हणून गौणी

भक्तीचें । साधन कोणतेंही साचें । काया मनें आणि वाचें । निरलसपणें जो सेवी ॥८८९॥ त्याच्याही इच्छा पुरती । पुढें निरिच्छ होते वृत्ती । सकल दुरितें दूर पळती । त्या भक्तापासून ॥८९०॥ प्रेमानें भजणारासी । ईश्वर सांभाळी अहर्निशीं । आणि अपरोक्ष ज्ञान होय ऐसी । बुद्धि ईश त्या देतसे ॥ ८९१ ॥ या म्हणण्यासी प्रमाण । गीतेमाजीं आहे जाण । दशमाध्यायीं अवलोकन । श्लोक दहावा करावा ॥८९२॥ एवं च साधन कोणतेंही । दृढतर आचरिल्या कार्य होई । म्हणून वाया जाणें नाहीं । गौणी भक्तीचें अनुष्ठान ॥ ८९३ ॥ जेंवी द्रव्यप्राप्तीचीं । साधनें नाना प्रकारचीं । शेती व्यापार नौकरी साची । इत्यादिक विबुध हो ॥ ८९४ ॥ परी तें साधन । एकविधा पाहिजे जाण । तन्निष्ठतेवांचून । फल नये प्रत्यया ॥ ८९५ ॥ कालमाना पाहून । साधनें तीं करावीं ग्रहण । कृतयुगामाजीं ध्यान । यज्ञयाग त्रेतायुगीं ॥ ८९६ ॥ द्वापारीं तें अर्चन । कलीमाजीं हरिकीर्तन । हा बलाबल पाहून । क्रम ठरविला शास्त्रानें ॥ ८९७ ॥ ह्या सशास्त्र चारी साधनें । आहे ईश्वराचें ज्ञान होणें । तें ज्ञान झाल्या पारणें । पराभक्तीचें फिटे पुढें ॥ ८९८ ॥ चारी ठिकाणीं दक्षता । ठेविली पाहिजे तत्त्वतां । भक्तिप्रतिबंधक वार्ता । विचारीं आणतां कामा नये ॥ ८९९ ॥

## अबंधोर्पणस्य मुखं ॥ ६४ ॥

सर्व कर्में ईश्वरासी । अर्पण करितां आदरेंसी । कर्मबंध निश्चयेंसी । नष्ट त्याचा होतसे ॥ ९०० ॥ श्रीमद्भगवद्गीतेंत । 'यत्करोषि' या श्लोकांत । सांगता झाला भगवंत । हेंच अर्जुनाकारणें ॥ ९०१ ॥ पापकर्में जीं कां आतां । तीं आर्पितां भगवंता । झाल्या बंधाची मुक्तता । विधिनिषेधाची वाट काय ? ॥ ९०२ ॥ ऐसें कोणी म्हणतील । तें विचारें फोल ठरेल । पात्राचा जातो मळ । प्रवाहांत आल्यावरी ॥ ९०३ ॥ तें घाणींत आहे जोंवर । शुद्ध न होय तोंवर । तोच आहे प्रकार । येथें पापकर्मांचा ॥ ९०४ ॥ पापकर्मींच रतमती । ते पंकाचे सोबती । अनुताप या प्रवाहाप्रती ।

ते न कधीं पावणार ॥ ९०५ ॥ अज्ञानें पाप केलें । तें अनुतापें कळून आलें । तो न पुन्हा कदा वळे । पापकर्म करावया ॥९०६॥ ऐशा अनुतापयुक्त पुरुषांचीं । कृतकर्में तीं व्हावयाचीं । ईश्वरार्पण साचीं । भलता अर्थ न करा त्याचा ॥ ९०७ ॥ सर्व कर्में ईश्वरार्पण । करावीं ऐसें ज्याचें मन । सांगे त्यास झालें ज्ञान । निश्चयेंकरून समजावें ॥ ९०८ ॥ कां कीं श्रोते ज्ञान होतां । कारण कर्म आणि कर्ता । या त्रिपुटीनें जाणतां । तो होतो स्वानुभवें ॥ ९०९ ॥ स्वानुभवाचें लक्षण । त्रिपुटया ह्या धारण । करणारा आहे कोण । हें समजणें विबुध हो ॥ ९१० ॥ हें तत्त्व कळतां क्षणीं । चित्तवासनेपासूनी । परावृत्त होऊनी । ब्रह्मीं स्थिर होतसे ॥९११॥ ती अवस्था यावयास । गौणी भक्ती साधन खास । म्हणून तिच्या सेवनास । करणें आहे साधका ॥ ९१२ ॥

## ध्याननियमस्तु दृष्टसौकर्यात् ॥ ६५ ॥

ईश्वराचें करितां ध्यान । दृष्ट फलाची प्राप्ती जाण । म्हणून ध्यानाचें साधन । सोपें आहे सर्वांमध्यें ॥ ९१३ ॥ छांदोग्य उपनिषदांत । 'य एषोंतरादित्ये' मंत्रांत । सूर्यध्यान साधकांप्रत । कसें करावें हें सांगीतलें ॥ ९१४ ॥ नारद पंचरात्रांत । हाच आहे सिद्धांत । पहा त्या श्लोकाप्रत । 'ध्येयः सदा सवितृ' हा ॥९१५॥ ऐसें श्रुति सांगते । स्मृतीही तिला गौरविते । एवं च ध्यानभक्तीतें । आधार मिळे दोहींचा ॥ ९१६ ॥ ऐसें असून तीच श्रुती । 'श्वेताश्वतरीं' सांगती । 'न सदृशे तिष्ठति- । रूपमस्य' ऐसें पहा ॥ ९१७ ॥ तेंवी स्मृतीच्याही ठायीं । याच अर्थाचीं वचनें पाहीं । गोंविलीं आहेत तेणें होई । समजुतीचा घोटाळा ॥९१८॥ कांहीं आकार कल्पिल्याविना । ध्यान करितां येईना । म्हणून श्रुतीनें केली आज्ञा । ध्यान साधका करण्याची ॥ ९१९ ॥ त्याच ध्यानाचा विचार । करूनियां साचार । श्रुतीनें दिला परिहार । कीं ईश्वरा आकार नसे॥९२०॥ मंद मुमुक्षूंसाठीं । ह्या ध्यानाच्या खटपटी । कथन केल्या शेवटीं । खरें तेंही सांगीतलें ॥ ९२१ ॥

कीं आकारविकाररहित । सच्चिदानंद आहे सत्य । तो नाहीं विषय खचित । चित्तीं ध्यान करण्याचा ॥ ९२२ ॥ हें जें आहे वाक्य । तें त्याच्यासाठीं देख । कीं जो पराभक्तीनें सम्यक । झाला सच्चिदानंदासी ॥ ९२३ ॥ मंदाधिकारी असून। जो पराभक्ती सेवी जाण । त्याच्या पदरीं पडे शीण । म्हणजे पुरा नास्तिक बने ॥ ९२४ ॥ म्हणजे वेदान्तश्रवणानें । सहज बहकून जाती मनें । त्याला गौणी भक्तीचीं साधनें । शाब्दिक ज्ञानें पटती ना ॥ ९२५ ॥ तो उघड उघड ऐसें म्हणत । मीच परब्रह्म साक्षात् । मशीं प्रेममय झालें जगत् । आतां बाधा कशाची ॥ ९२६ ॥ हें शब्दार्थानें आहे सत्य । परी अनुभव नाहीं यत्किंचित् । ऐसे ज्ञानी झाले बहुत । या अलीकडच्या काळा-मध्यें ॥ ९२७ ॥ तेणें स्वानुभव दुरावला । शाब्दिक ज्ञाना पूर आला । बहुरुप्याच्या सोंगाला । राजे म्हणण्याची वेळ आली ॥ ९२८ ॥ ऐशी न यावी आपत्ती । कोण्याही शाब्दिक ज्ञान्या-प्रती । म्हणून ही गौणी भक्ती । सांगते झाले ज्ञाते जन ॥९२९॥ बैठक पराभक्तीची । पूर्ण बसावया साची । पायावांचून इम-ल्याची । उभारणी ना करणें बरें॥९३०॥श्रुतीनें जें कथिलें ध्यान । तें इतुक्यासाठीं जाण । अनावर जें आहे मन । त्यासी आळा बसा-वया ॥९३१॥ वस्तुतः परमेश्वर । आहे निर्गुण निराकार । करितां नये साचार । त्याचें ध्यान कवणासी ॥९३२॥ म्हणून भास्कराचे ठायीं। पुरुष एक कल्पिला पाहीं । आणि तद्-लक्षणेंत ही ।हिर-ण्यकेशादी कथन केलीं ॥९३३॥ हें सांगण्याचा हेत । इतुकाच आहे खचित। कीं तीव्र साधकाप्रत । ध्यान करितां यावें हो ॥९३४॥तें ध्यान पुरें झालें।मन तादात्म्य पावलें। मग ऐसें वाटलें । हा आकारी पुरुष व्यापक कसा ॥ ९३५ ॥ ऐशा त्या अधिकाऱ्या कारण । तें श्वेताश्वतराचें वचन । आणि त्याच हेतूला धरून । जैमिनीही बोलला ॥९३६॥ एवंच ही गौणी भक्ती । पराभक्तीची व्हाया प्राप्ती । केवळ सोपान निश्चिती । आतां फार कथणें नको ॥ ९३७ ॥ कीर्तन ध्यान झालें । आतां पूजन राहिलें । तें सर्व बाजूंसह कथन केलें । आहे पुढल्या सूत्रांत ॥ ९३८ ॥

## तद्याजिः पूजायामितरेषां नैवम् ॥ ६६ ॥

पूजा या शब्दाठायीं । यज् धातू आहे पाहीं । त्याचा अर्थ ये ठायीं । पूजन ऐसा करावा ॥ ९३९ ॥ इतरत्र यज् धातूचा । अर्थ यज्ञवाचक साचा । तो न येथें घ्यावयाचा । यासाठीं हें सूत्र असे ॥ ९४० ॥ ' स्वर्गकामो यजेत ' । या श्रुतीच्या मंत्रांत । यज् धातूचा अर्थ । यज्ञवाचक होतसे ॥ ९४१ ॥ इच्छा स्वर्ग सुखाची । ज्या कोणा असेल साची । त्याला आज्ञा वेदाची । आहे यज्ञ करण्यास्तव ॥९४२॥ म्हणजे आशायुक्त असल्या मन । त्यानें सशास्त्र कर्माचरण । केलें पाहिजे आवर्जून । हा वेदाचा दंडक असे ॥ ९४३ ॥ येथें काम्य कर्माचा । संबंध मुळींच नाहीं साचा । प्रादुर्भाव परेचा । होतो कोणत्या साधनें ॥ ९४४ ॥ त्या साधन विचाराचें । हें प्रकरण आहे साचें । म्हणून यज् या शब्दाचे । अर्थ यज्ञात्मक करूं नका ॥ ९४५ ॥ गीतेच्या नवमाध्यायीं । पंचविसाव्या श्लोकाठायीं । यज् धातूचा अर्थ पाहीं । पूजन ऐसाच केला असे ।।९४६।। शिवाय असल्यास निष्कामपूजा । ती प्राप्त करून दे अधोक्षजा । कर्मकांडांत ऐशी मजा । नाहीं मुळीं विबुध हो ॥ ९४७ ॥ महाभारताभीतरीं । बोलली व्यासांची वैखरी । दोनशें पासष्टाभीतरीं । अध्यायीं शांतिपर्वाच्या ।।९४८।। तो करावा अवलोकन । तेथें हेंच आहे कथन । यज्ञादिककर्माहून । भजनपूजन श्रेष्ठ असे ॥ ९४९ ॥ म्हणून भजनपूजनादि प्रकार । हें पराभक्तीचें अंग साचार । ती निष्काम अहेतुक झाल्यावर । प्राप्ती पराभक्तीची ॥ ९५० ॥

## पादोदकं तु पाद्यमव्याप्तेः ॥ ६७ ॥

पादोदक ईश्वराचें । मानवा करी पवित्र साचें । परी तें उदक पायाचें । भगवंताच्या होय कसें ॥ ९५१ ॥ त्याची मुळींच अव्याप्ती । पाय कोठून तयाप्रती । आणि जे पायांवर घालिती । उदक तें पादोदक ॥ ९५२ ॥ वा पदापासून । जें उत्पन्न झालें

जीवन। त्यालाही अभिधान। पादोदक देतां ये॥९५३॥पायांचाच नाहीं पत्ता। तेथें पादोदक ही वार्ता॥वाचारंभण तत्त्वतां। म्हणणें भाग होईल हो॥९५४॥परी ही शंका आहे फोल। ही विचारापुढें ना टिकेल। अव्याप्ति शब्दा न मिळेल। स्थानही नुसतें ते ठायीं ॥ ९५५ ॥ व्याप्ती सच्चिदानंदाची। सर्वत्र आहे साची। व्याप्ति आणि अव्याप्तीची। कल्पना येथ करणें नको ॥९५६॥ ही सच्चिदानंद देवता। पराभक्तीची तत्त्वतां। चालू प्रकरण पाहतां। तें आहे गौणीचें ॥ ९५७ ॥ पहा पूजनाप्रत। कांहीं तरी पूज्य लागत। त्यावीण ही ना घडत। पूजारूप क्रिया कदा ॥ ९५८ ॥ अवतारी देव म्हणून। करण्या योग्य पूजन। त्यांच्या प्रतिमा करून। तद्भावें पूजाव्या ॥ ९५९ ॥ गंगा यमुना भागीरथी। ह्या विष्णुपादोद्भव मानिती। परी यांच्यापेक्षां श्रेष्ठता ती। प्रत्यक्ष पादोदका असे ॥ ९६० ॥ पादोदक हा शब्द सत्य। सूत्रामाजी आहे ग्रथित। त्याचा विग्रह प्रशस्त। होय केल्या येणें रितीं ॥ ९६१ ॥ पादार्थ जें उदक। तेंच होय पादोदक। मग उरे न शंका देख। कोणत्याही प्रकारें ॥९६२॥ येणें रितीं प्रतिमेचें। तीर्थ घेणें योग्य साचें। जें निर्मूलन पातकाचें। करणार आहे साधकांच्या ॥ ९६३ ॥

## स्वयमर्पितं ग्राह्यमविशेषात् ॥ ६८ ॥

जे ईश्वरार्पित बुद्धीनें। पदार्थ ईश्वराकारणें। आर्पिले असतील त्याचा घेणें। प्रसाद म्हणून अवशेष ॥ ९६४ ॥ स्वतः करून पूजन। तीर्थ करावें ग्रहण। वा भगवंताचें म्हणून। इतरें दिलें तेंही घ्यावें ॥ ९६५ ॥ पहा पंढरींत खिरापती। भगवंताला आर्पिती। आणि त्या एकमेकां देती। प्रसाद हरीचा म्हणून॥९६६ भगवदर्पित अवघें घ्यावें। प्रसाद म्हणून बरवें। मात्र तेथें वगळावें। ठेविलेल्या दक्षिणेला ॥९६७॥ कां कीं दान शब्दांत। दा धातू आहे सत्य। या धात्वर्थें नाहीं उरत। मालकी ती घ्यावया ॥ ९६८ ॥ क्रिया ही दान। तव्हांच होय जाण। ती दिलेल्या

कारण । मालकी अर्पावी लागते ॥ ९६९ ॥ ऐशा रितीं तीर्थ-ग्रहण । वा प्रसादाचा अवशेष जाण । घेणें अनन्यभावें करून । निष्ठा ठेवून भगवंतीं ॥ ९७० ॥

## निमित्तगुणाव्यपेक्षणादपराधेषु व्यवस्था ॥ ६९ ॥

पूजादिकांचें विधान । जें शास्त्रांत केलें कथन । त्याचें करावें पालन । दक्षता ती ठेवूनियां ॥ ९७१ । क्रम पूजाविधानाचा । चुकूं न द्यावा साचा । चुकल्या दोष जावया त्याचा । प्रायश्चित्त करावें ॥९७२॥ श्रीवराहपुराणांत । या पूजाविधानांत । बत्तीस प्रकारचे घडतात । दोष म्हणुन सांगितले ॥९७३॥ त्याचें सामान्य उदाहरण । थे ठायीं करितों कथन । आधीं नैवेद्य मग स्नान । वा पुष्पें धूपानंतर ॥९७४॥ अशा प्रकारचे दोष घडतां । प्रायश्चित्ताची आवश्यकता । त्यावांचून सांगता । न होय सशास्त्र पूजेची ॥९७५॥ हे पूजनविधीचे प्रकार । पूजांगें होत साचार । म्हणून दोषांचा प्रतिकार । करणें आहे आवश्य ॥ ९७६ ॥ जेथें या क्रमासी । संबंध ना कोणत्याही अंशीं । ऐसें अविधी कृत्य झाल्यासी । प्रायश्चित्त त्याला नसे ॥ ९७७ ॥ तुलसीपत्र शंकराला । वा बिल्वपत्र विष्णूला । वा श्वेत पुष्पें गणपतीला । वा दूर्वांकुर देवीसी ॥ ९७८ ॥ ऐसें कृत्य अविधी असे । परी तें प्रायश्चित्ता योग्य नसे । म्हणून तें क्षम्य असे । अविधीकृत्य झालेलें ॥९७९॥ ऐशा अपराधाच्या ठायीं । हेतूस प्राधान्य असे पाहीं । तो आवर्जन जेथें नाहीं । तेथें कांहीं करणें नको ॥ ९८० ॥ म्हणजे मुद्दाम शिवाकारण । बिल्वपत्रातें वगळून । तुळस केल्यास अर्पण । वा विष्णूला बिल्वपत्र ॥ ९८१ ॥ हें जो तें करी । तें उन्मत्तपणें निर्धारीं । तेथें अनन्यतेवरी । कुऱ्हाड ज्याच्या प्रथमता ॥ ९८२ ॥ शिवार्चनीं बैसला । बिल्वपत्राचा तपास केला । परी नाहीं लाभ झाला । प्रयत्न करून बेलाचा ॥ ९८३ ॥ तेथें बिल्वपत्र समजून । तुळस केल्यासी शिवा अर्पण । तेथें दोषाचें दोषपण । अविधी ना ठरे कदा ॥ ९८४ ॥ शिव तोच आहे हरी ।

मग तो तुळसीची मंजिरी । बिल्व ऐसें मानील खरी । भक्ताच्या सद्धेतुमुळें ॥ ९८५ ॥ स्नान गंधानंतर । पुष्पें वाहणें साचार याच एकया विधीवर । दृष्टी ठेवून असावें ॥ ९८६ ॥ त्या वेळीं जें मिळेल कांहीं । तें मूर्तीस वाही पाहीं । तेथें तांबडया पांढ-ऱ्याचा नाहीं । दोष श्रोते अणुमात्र ॥ ९८७ ॥ ह्या पुष्पादिकांच्या अपराधासी । पूजांगत्व ना निश्चयेसी । शक्य तेथवर क्रमासी । सांभाळिलें पाहिजे ॥ ९८८ ॥

## पत्रादेर्दानमन्यथा हि वैशिष्ट्यं ॥ ७० ॥

पत्र पुष्प फल आणि पाणी । या चार वस्तु शास्त्रांनीं । अर्पण करण्यालागूनी । सांगितल्या असती ईश्वरा ॥ ९८९ ॥ परी ह्या वस्तू चार । हीन किमतीच्या साचार । ईश्वर जो कां अती थोर । त्याला का ह्या वाहणें ॥ ९९० ॥ सार्वभौम राजाकारण । चार कवडया अर्पण । केल्या भूपतीचा अपमान । होणार आहे निस्संशय ॥९९१॥ त्यांतून या कवडयांप्रत । कांहीं आहे किमत । तीही या वस्तूंप्रत । नाहीं नाहीं विबुध हो ॥९९२॥ परी ईश्वरा-र्पणाविधी ठायीं । किमतीचें महत्त्व नाहीं । तेथें विशेषत्व राही । एका अनन्यतेला ॥ ९९३ ॥ कोणी कोणाच्या आग्रहानें । वा कोणी अश्रद्धेनें । करूनी नाना पक्वान्नें । गेला अर्पण्या ईश्वरास ॥ ९९४ ॥ परी त्याचा उपयोग नाहीं । तें अवघें दांभीक पाहीं । ईश्वराला मान्य नाहीं । मुळींच ही दांभीकता ॥ ९९५ ॥ महत्त्व दंभाचाराचें । व्यवहारांत राहे साचें । तेथें देणाघेणाराचें । महत्त्व ओळखणें विधी हा ॥ ९९६ ॥ शिवाय पूजेचें विधान । सर्वांसाठीं आहे जाण । तेथें उत्तम मध्यम दुबळा हीन । हे भेद नसती कीं ॥ ९९७ ॥ पूजेच्या संकल्पांत । यथाशक्तीपद सत्य । आहे त्या यत्किंचित । विरोध ना आणावा ॥ ९९८ ॥ पहा राज-कन्या मिराबाई । हरीच्या नैवेद्यार्थ पाहीं । नाना पक्वान्नें करूनि नेई । तैसे राजभोग अवांतर ॥ ९९९ ॥ ती राजकन्या होती म्हणून । तिला हें होतें अनुकूलपूर्ण । या अवघ्याची होती वाण ।

जनाबाईचे ठिकाणीं ॥ १००० ॥ मीरा घाली मोतीचूर । जनी कांदाभाकर । परी दोहींला शारंगधर । पावला आहे सारखा ॥ १००१ ॥ या दोहींच्या उपचाराला । देव नाहीं भाळला । या दोहींच्या अनन्यतेला । झाला आहे ईश्वर वश ॥ १००२ ॥ येथें मिराबाई जरी । घालिती कांदाभाकर खरी । वा जनाबाई वर्गणी करी । हरीला शिरा घालावया ॥१००३॥ तरी तो प्रयत्न फोल ठरता । दंभाचारास ऊत येता । ज्यानें त्यानें योग्यता । आपुली जाणिली पाहिजे ॥ १००४ ॥ ती जाणावी म्हणून । फलपुष्पांचें केलें विधान । उच्च वस्तूंचा अपमान । करण्यासाठीं न केलें तें ॥ १००५ ॥ शक्ती असल्या बहुमोल । पदार्थ अर्पावे सकल । ती नसल्या नुसतें जल । अर्पा अनन्यतेनें ॥ १००६ ॥ श्लोकामधील वस्तू चार । शक्य सर्वां साचार । त्यांची प्राप्ती होणार । आहे सर्वांसारखी ॥ १००७ ॥ म्हणून या चारींचीच । नांवें घेतलीं साचीं । म्हणून वाटाघाट याची । कुकल्पनेनें करणें नको ॥ १००८ ॥

सुकृतजत्वात्परहेतुभावाच्च क्रियासु श्रेयस्यः ॥ ७१ ॥

ही अवघी गौणी भक्ती । सुकृतजन्य निश्चिती । हिच्यापासून उत्पत्ती । होणार आहे परेची ॥ १००९ ॥ म्हणून श्रौतस्मार्तकर्माहून । ही गौणी भक्ती श्रेष्ठ जाण । नाहीं नाहीं इच्या समान । साध्य साधण्या साधन तें ॥ १०१० ॥ आतां या गौणी भक्तीठायीं । शंका एक उत्पन्न होई । या गौणी भक्तीनें दृढ होई । सेव्यसेवकभाव हा ॥ १०११ ॥ हा भाव झाल्या जागृत । चित्तीं ठसे सिद्धांत द्वैत । मग तोच सेवून अद्वैत । मोक्षसुखा पावे कसा ॥ १०१२ ॥ आणि जोंवरी न गेलें द्वैत । तोंवरी तयाप्रत । जन्ममृत्यूच्या फेऱ्यांत । घिरट्या घालणें भाग असे ॥१०१३॥ शिवाय राजस तामस वृत्ती । ह्या गौणी भक्तीमाजी उठती । विषयवासना बळावती । अनुष्ठानें गौणीच्या ॥ १०१४ ॥ ईशतत्त्वाचा विसर । इनेंच पडे साचार । पहा वाढला अहंकार ।

हिरण्यकश्यपूस अनुष्ठानें ॥ १०१५ ॥ गौणीमुळें असे प्रकार । प्रत्यया येती साचार । त्याला दुसरा नको आधार । पहा जगरहाटीकडे ॥ १०१६ ॥ परी हे न प्रकार गौणीचे । हे ते राजसतामस वृत्तींचे । म्हणून सारासार विचाराचें । महत्त्व ठेवणें गौणींत ॥१०१७॥ गौणी भक्तीस सेवावें । सत्त्वगुणास वाढवावें । पुढें मुळीं न ठरूं द्यावें । राजसतामस वृत्तींना ॥ १०१८॥ म्हणजे ती सुकृतजन्य होईल । पापासही घालवील । ऐसें बोलला घननीळ । सप्तमाध्यायीं गीतेंत ॥ १०१९ ॥ तेथें अठ्ठाविसाव्या श्लोकांत । हाच आहे भावार्थ । तो श्लोक आणा ध्यानांत । 'येषां त्वंतगतं पापं' ॥ १०२० ॥ सत्त्वगुणें करून । जेव्हां गौणी भक्ती होय पूर्ण । तेव्हां पराभक्तीकारण । तीच होय पहा हेतू ॥ १०२१ ॥

गौणत्रैविध्यमितरेण स्तुत्यर्थत्वात्साहचर्यं ॥ ७२ ॥

आर्त जिज्ञासू अर्थार्थी । ह्या गौणीच निश्चिती । परी आहे केली स्तुती । साहचर्यानें तयांची ॥ १०२२ ॥ भक्तित्व आहे म्हणून । साहचर्यें केलें वर्णन । परी या मोक्षालागून । न देती कदाही ॥ १०२३ ॥ मोक्ष जो कां आहे मिळणें । तो एक पराभक्तीनें । वर्णन साहचर्यानें । झालें परी ना त्यांत सार ॥१०२४॥ साहचर्याच्या वर्णनांत । समावेश मात्र होत । परी अधिकारासी नाहीं येत । गौणत्व तें कधींही ॥१०२५॥ शब्द घ्या हा दरबार । येथें दरकदार शिलेदार । दिवाण आणि नृपवर । यांचा समावेश झाला असे ॥ १०२६ ॥ परी अधिकार ज्यांचे त्यांचे । तसेच राहिले साचे । दिवाण पदवीस भूपाचे । गेला नाहीं कधींही ॥ १०२७ ॥ तो दिवाणची राहिला । नृप तेथेंही थोर ठरला । त्याच न्यायें गौणीला । नये अधिकार परेचा ॥ १०२८ ॥ मोक्षदात्री पराभक्ती । हें न विसरा कल्पांतीं । गीता हेंच सांगती । ज्ञानी भक्त श्रेष्ठ असे ॥ १०२९ ॥ आर्त भक्तीचें लक्षण । संकटाचें निरसन । होऊन व्हावें संपन्न । यास्तव जी करणें ती ॥१०३०॥

ईश्वराचें ज्ञान व्हावें। खरेंखोटें कळावें। यास्तव जी तिला म्हणावें। जिज्ञासू भक्ती पहा ॥ १०३१ ॥ आतां भक्ती अर्थार्थी। इचे दोन भेद असती। इहपर लोकीं सुखद स्थिती। यास्तव जी करणें ती ॥ १०३२ ॥ वा उत्पन्न व्हावी पराभक्ती। ऐसी आस धरोनि चित्तीं। जी करणें तीहि होती। भक्ती अर्थार्थी विबुध हो ॥१०३३॥ नवविधा भक्ती भागवतींच्या। याही गौणी स्वरूपाच्या। परी सेवनीं यांच्या। विवेकें पराभक्ती उपजे ॥१०३४॥

## बहिरंतरस्थमुभयमवेष्टिसववत् ॥ ७३ ॥

गौणीभक्तीचें प्रयोजन। जेव्हां परेसाठीं असेल जाण। तेव्हां त्या होतील पूर्ण। अंग पराभक्तीचें ॥१०३५॥ आणि त्या गौणी भक्ती सकळ। चित्त व्हाया निर्मळ। पापनासत्या असतील। तेव्हां असती प्रधान त्या ॥ १०३६ ॥ पहा राजसूय प्रकरणा-पोटीं। अवेष्टिनामक एक इष्टी। ती जेव्हां यज्ञासाठीं। असेल तें ती अंग त्याचें ॥ १०३७ ॥ आणि जेव्हां राजसूय यज्ञाचा। संबंध कांहीं नसेल साचा। तेव्हां ती इष्टी करण्याचा। ब्राम्हणाही अधिकार ॥ १०३८ ॥ कां कीं यज्ञ हा राजसूय। करण्या पाहिजे क्षत्रिय। आणि त्या यज्ञाकरतां होय। अवेष्टि हें अंग त्याचें ॥ १०३९ ॥ म्हणजे राजसूय यज्ञाठायीं। अवेष्टि हें अंग पाही। त्या ठिकाणीं तिला नाहीं। प्रधानत्व यत्किंचित ॥१०४०॥ जेव्हां राजसूयावांचून। अवेष्टि इष्टीपासून। फळ मिळवण असें जाण। तेव्हां ती प्रधान असे ॥ १०४१ ॥ तोच न्याय गौणीचा। तंतोतंत असे साचा। जेव्हां लाभ पराभक्तीचा। करणें नसेल तिच्यापून ॥ १०४२ ॥ तेव्हां गौणीभक्ती प्रधान। मानणें आहे जाण। चित्तशुद्धि आणि पापनाशन। तिच्या सेवनें करून घ्यावें ॥ १०४३ ॥ पहा अरेकस व्यापारी। फळ्या कापून तयार करी। आणि विकीत बसे बाजारीं। आपुला धंदा म्हणून ॥ १०४४ ॥ तेव्हांही अरेकसी। प्रधानकृत्य सर्वांशीं। म्हणावें लागेल निश्चयेंसी। धंद्यापुरतें तयाच्या ॥ १०४५ ॥

तीच क्रिया सुतार। जेव्हां करील साचार। पेटी पाट करण्या द्वार। तेव्हां ती अंग होईल ॥ १०४६ ॥ तेंवी पाप नाश व शुद्ध चित्त। व्हावें हाच हेतू सत्य। तेव्हां मात्र त्या भक्तीप्रत। प्रधानत्व येतसे ॥ १०४७ ॥ परी पराभक्ती साधावया। जेव्हां करणें असती याच क्रिया। तेव्हां अंगत्व येई यांच्या ठाया। पराभक्तीचे निःसंशय ॥ १०४८ ॥

## स्मृतिकीर्त्योः कथादेश्चार्तौ प्रायश्चित्तभावात् ॥ ७४ ॥

स्मृती कीर्ती आणि कथा। ह्या तिन्ही गोष्टी तत्त्वता। त्या प्रायश्चित्ताकरितां। म्हणून म्हणा यांतें आर्त ॥ १०४९ ॥ आर्त भक्तीचें प्रयोजन। व्हाया पापाचें क्षालन। व अवांतर दोष दारुण। जे कांहीं असतील ते ॥ १०५० ॥ तें पाप ताप आणि दैन्य। या तिहींनीं होतें हरण। म्हणून ईशाचें गुणवर्णन। आठवून करावें ॥ १०५१ ॥ म्हणजे ईशस्मरणें वा चिंतनें। वा तयाच्या गुणवर्णनें। त्रिविध दोष दहन होणें। आहे म्हणून आर्त त्या ॥ १०५२ ॥ ठायीं ठायीं पुराणांत। हेंच कथिलें सत्य। अवध्यांची पूर्ती होत। एक विष्णुस्मरणानें ॥ १०५३ ॥

## भूयसामननुष्ठितिरितिचेदाप्रयाणमुपसंहारान्महत्स्वपि ॥ ७५ ॥

श्रुतिप्रतिपाद्य यज्ञादिक। जीं मोठमोठीं साधनें देख। तेणेंच व्हावी निःशंक। प्राप्ती त्या मोक्षासी ॥ १०५४ ॥ अल्प श्रमसाध्य नामस्मरण। वा ईशाचें गुणवर्णन। यांच्या सेवनें करून। मोक्ष कैसा प्राप्त व्हावा ॥ १०५५ ॥ परी हें स्मरण कीर्तन। साधणें आहे दुर्घट जाण। यज्ञयागादिक याहून। सोपेंच म्हणणें भाग असे ॥ १०५६ ॥ यज्ञावडंबर थोर दिसे। परी श्रम ना पडती फारसे। ते बाह्योपाधीनें भासे। अती कष्टाचे म्हणून ॥ १०५७ ॥ या स्मरणकीर्तनांत। बाह्योपाधी ना यत्किंचित्। तें साध्य व्हाया अतोनात। श्रम पडती हें खरें

असे ॥ १०५८ ॥ जाणीव त्या श्रमाची । ज्याची त्यालाच होते साची । ती न कदा कळावयाची । पराकारणें विबुध हो ॥ १०५९ ॥ खटाटोप यज्ञाचा । मोठा आणि श्रमाचा । परी विचार करतां फळाचा । अती अल्प फळ त्यासी ॥ १०६० ॥ स्मरण कीर्तनें तसें नाहीं । फळ मोठें प्राप्त होई । कां कीं याला मुळीं नाहीं । कालाची ती मर्यादा ॥ १०६१ ॥ आमरणपर्यंत । तें चालविणें आहे सत्य । होऊनिया वैराग्यभरीत । तें हें येथें विसरूं नका ॥ १०६२ ॥ डोंगर कोरून मूषकाची । प्राप्ती यज्ञादिकीं साची । या स्मरण चिंतन साधनांची । नाहीं स्थिति त्यांच्यापरी ॥ १०६३ ॥

## लघ्वपि भक्ताधिकारे महत्क्षेपकमपरसर्वहानात् ॥ ७६ ॥

अल्प श्रमसाध्य स्मरण । ऐसें कांहीं वेळ मानलें जाण । परी तें टिके मुळींच न । विचार करतां स्मरणाचा ॥ १०६४ ॥ एक वेळ करवेल यज्ञ । परी न करवेल स्मरण । नुसतें शब्दपारायण । यासी स्मरण म्हणतां नये ॥ १०६५ ॥ ज्याचें करणें आहे स्मरण । तो कसा कोठें आणि कोण । हें जरी जाणील मन । तरीच तें स्मरण घडे ॥ १०६६ ॥ याची वाण जे ठायीं । तें मुळीं स्मरण नाहीं । तें शब्दपारायण पाहीं । शीणमात्र वाचेला ॥ १०६७ ॥ क्रिया स्मरण करण्याची । सोपी आणि साधी साची । क्रियेवरून स्मरणाची । रूपरेखा आखूं नका ॥१०६८॥ प्रयोजन प्रायश्चित्ताचें । यासाठीं आहे साचें । पापोद्भव दुःखांचें । निरसन व्हावें म्हणून ॥ १०६९ ॥ समजा दुःखाच्या परिहारा । यज्ञआरंभ केला खरा । तोही आरंभ साजिरा । क्लेशोद्भव आहे कीं ॥ १०७० ॥ पहा यज्ञधूम डोळयांस । देतसे सदैव क्लेश । वा घेतां पंचगव्यास । दुःखद तें जिव्हेला ॥ १०७१ ॥ वा गायत्रीपुरश्चरण । करणें जलांत बैसून । हेंही दुःख दारुण । देणार आहे तनूला ॥ १०७२ ॥ ऐशा रीतीं प्रायश्चित्त । तेंही आहे दुःखभूत । मग तें पापोद्भव दुःखांप्रत । हें दुःख कैसें हरी ॥ १०७३ ॥

उलट ऐसें होईल । दुःखाशीं दुःख मिसळेल । आणि यातनेचा होईल । डोंब या दोहींमुळें ॥ १०७४ ॥ परी हा एकांगीं विचार। झाला न पाहतां सारासार । प्रायश्चित्ताचा प्रकार । आहे मुळींच निराळा ॥ १०७५ ॥ समजा आला शीतज्वर । तोही वाढला भयंकर । प्राणी झाला बेजार । त्या न यातना सहन होती ॥ १०७६ ॥ त्या किराइत कुटकीचा काढा दिला । जो परम कडू आहे भला । परी त्यानें घालविला । शीतज्वर श्रोते हो ॥ १०७७ ॥ येथें तापाच्या यातना । आणि औषधाचा कडू-पणा । ह्या न दुप्पट झाल्या जाणा । औषधें रोगा घालविलें ॥ १०७८ ॥ म्हणजे औषध हें प्रायश्चित्त । शीतज्वर हें पाप सत्य । तोच न्याय तंतोतंत । येथें लावणें भाग असे ॥ १०७९ ॥ रोग शक्तीप्रमाणें । जैसें औषध आहे देणें । तेवीं पातकाप्रमाणें । भाग करणें प्रायाश्चित्त ॥ १०८० ॥ ब्रम्हहत्यादि जाया दोष । करणें अश्वमेधास । तेच सांसर्गिकास । नित्यकर्में पुरती हो ॥ १०८१ ॥ त्याहून जीं विशेष देख । त्यासाठीं नैमित्तिक । कथन केलीं असतीं चोख । ग्रंथीं पूर्वाचार्यांनीं ॥ १०८२ ॥ दुःख प्रायश्चित्ताचें । अती अल्प होतें साचें । म्हणून ग्रहण तयाचें । करणें भाग आहे कीं ॥ १०८३ ॥ औषधाच्या कडवटपणा । आणि रोगाच्या यातना । ह्या दोन्हीही नुरती जाणा । रोग बरा झाल्यावर ॥ १०८४ ॥ तेंवी ईशाचें नामस्मरण । हें औषधीचे समान । हेंच करी निर्मूलन । मोठमोठ्या दोषांतें ॥ १०८५ ॥ ही औषधी नामस्मरण । सर्व दोषां करी हरण । परी औषधी गुणाचें मान । अधिकारानुरूप कर्त्याच्या ॥ १०८६ ॥ नामस्मरण करणाराचें । चित्त पाहिजे शुद्ध साचें । त्याच्या ठायीं ईशाचें प्रेमही पाहिजे अलोट ॥ १०८७ ॥ त्याचें स्मरण फलद होतें । दांभिकाचें वायां जातें । जावत्काल उपरतीतें । उदय न झाला त्याचे ठायीं ॥ १०८८ ॥ म्हणजे स्मरणकर्त्याठायीं । चित्तशुद्धि आवश्य पाहीं । त्यावांचून येत नाहीं । अधिकार त्या स्मरणाचा ॥ १०८९ ॥ ही भक्तीची वासना । पूर्व सुकृताविण जाणा । होत नाहीं पहा कवणा । ऐसी ही कठीणतर ॥१०९०॥ सशास्त्र

कर्माचरणानें। पुण्यसंचय आहे होणें । तीं विविध जन्मांचीं पुण्यें। जेव्हां येती एकवटून ॥१०९१॥ तेव्हांच वासना भक्तीची। चित्ताठायीं होते साची । ती झाल्या जन्माची। सार्थकता करणें कर्त्याकडे ॥ १०९२ ॥ ऐशा अधिकाऱ्यालागून । हें भक्तीचें विधान। सांगते झाले ज्ञातेजन । पूर्ण विचार करूनियां ॥ १०९३ ॥

## तत्स्थानत्वाद्यनन्यधर्मः खलेवालीवत् ॥ ७७ ॥

आतां दोषांचें व्हावया दहन । भक्ती प्रायश्चित्तासमान। मग ती प्रायश्चित्तापरी जाण। असली पाहिजे निःसंशय ॥ १०९४ ॥ प्रायश्चित्तविधीला । प्रायश्चित्तपण येण्याला । करणें कांहीं विधींला। तैसें येथेंही असावें ॥ १०९५ ॥ गोमय गोमूत्र आणि दूध। दधी आणि मध। हें मिसळल्या होई सिद्ध । पंचगव्य ही वस्तू ॥ १०९६ ॥ तैसा कांहीं करणें विधी। आहे काय भक्ती मधीं। तिची करावया सिद्धी । यासाठीं हें सूत्र ॥ १०९७ ॥ दोषदहना भक्तीचा । अधिकार प्रायश्चित्तापरी साचा। परी भक्ती सिद्ध करण्याचा । विधी नाहीं कोणताही ॥ १०९८ ॥ भक्ती हें प्रायश्चित्त। आहे विधीच्या विरहीत । केवळ खलेवालीवत्। त्याचा विचार करूं आतां ॥ १०९९ ॥ श्येन नामक यज्ञाप्रती। एकादश स्तंभ असती । त्या प्रत्येक स्तंभाकारणें देती। यूप हीच संज्ञा ॥ ११०० ॥ परी त्या दशयूपां कारण। संस्काराचें प्रयोजन। संस्कारावांचून । यूपत्व त्या येणें नसे ॥ ११०१ ॥ परी श्येन नामक यज्ञाचा। यूप वाली नांवाचा। संस्काररहित आहे साचा। त्या न संस्काराचें प्रयोजन ॥११०२॥ अवांतर यूपांकारण । अष्टास्त्री करणादिकेंकरून । करावा लागतो जाण। संस्कार प्रत्येका ॥ ११०३॥ तेव्हां त्यासी यूपत्व येतें। आणि यूपत्वाचें कामही होतें । परी या वालीनामक यूपातें। नाहीं संस्कार कोणताही ॥११०४॥ तो संस्कारावांचून। यूपत्वा पावला जाण। तेवीं भक्तीचें महिमान। आहे हें ध्यानीं धरा ॥ ११०५ ॥

## आनिंद्ययोन्याधिक्रियते पारंपर्यात् सामान्यवत् ॥ ७८ ॥

या भक्तीचा अधिकार । सर्वांस आहे साचार । भक्तिसेवनें उद्धार । होतो हा सिद्धांत असे ॥११०६॥ वेदें अवघेंचि निर्मिलें । भक्तीलाही प्रतिपादलें । कर्मकाण्डही कथन केलें । आणि तत्त्वही सांगता वेदचीं ॥११०७॥ म्हणजे जेवढें आहे जगाठायीं । तेवढें आहे वेदांत पाहीं । एकालाही सोडिलें नाहीं । या समर्थ वेदानें ॥ ११०८ ॥ मात्र साधनांची वांटणी । केली अधिकार पाहूनी । भक्ती साधनांचा मुगुटमणी । तो अवघ्यांसी सारखा ॥ ११०९ ॥ भक्तीसेवनें उद्धार । होत आला पूर्वापार । पहा महात्मा विदुर । अथवा रामभक्त शबरी ती ॥ १११० ॥ रोहिदास चर्मकार । पंढरींत चोखा महार । यांचा झाला उद्धार । याच भक्तीच्या साधनें ॥ ११११ ॥ आतां श्रुतीभितरीं । एक ऋचा ऐशापरी । ती येथें देतो खरी । 'निषादस्थपातिं याजयेत' ॥ १११२ ॥ एतया निषादस्थ पतीं । ऐसी आहे जेव्हां श्रुती । तेव्हां वेदाधिकार निश्चिती । आहे शूद्रादिकांला॥१११३॥ ऐसे वेदद्वेष्टे पापीजन । हें वाक्य पुढें करून । वर्णाश्रमालागून । बिघडावया पाहतील ॥ १११४ ॥ वर्णाश्रम बिघडतां । अवघीच होईल अनवस्था । बगीच्याचा उच्छेद करितां । भरणें गाड्या सरपणाच्या ॥ १११५ ॥ जो सरपणाच्या गाड्या भरी । आणि त्या भरण्याची इच्छा करी । अशाचिया अंतरीं । प्रेम नुपजे उपवनाचें ॥ १११६ ॥ वर्णाश्रमाची पद्धती । उपवनाप्रमाणें निश्चिती । झाडें वेली नाना जाती । धर्मही त्यांचे निराळे ॥१११७॥ पोषक खतांचे प्रकार । वृक्षांप्रमाणें साचार । उंसाचें ना भावणार । खत जाईजुईला ॥ १११८ ॥ समान धर्म इतुकाच तेथ । जमीन पाणी सर्वांप्रत । लागे परी खतांत । पोषक जाचक भेद असे ॥ १११९ ॥ याकडे लक्ष देऊन । वर्णाश्रमपद्धती निर्मिली जाण । तेथें करितां अधिक न्यून । पुढें अनर्थ रोकडा ॥ ११२० ॥ म्हणून ज्या त्या जातीकारण । जे जे धर्म कथिले जाण । त्या त्या आज्ञेचें पालन । वेदाज्ञेरूप करावें

॥ ११२१ ॥ कां कीं वेद नाहीं कादंबरी। तो स्वानुभवाचा प्रत्यक्ष गिरी। त्या वेदाची नये सरी। कोणत्याही ग्रंथातें ॥ ११२२ ॥ म्हणून रहा सावधान। वेदाज्ञेचें करा मनन। उगीच शिकून व्याकरण। तेथें संकर करूं नका ॥ ११२३ ॥ 'निषाद-स्थपति' शब्दाचा। समास षष्ठीतत्पुरुष केल्या साचा। सरळ अर्थ वेदाचा। लागणार आहे विबुध हो ॥ ११२४ ॥ तोच कर्मधारय केल्यावरी। आपत्ति येणार आहे खरी। सुव्यवस्था जाईल सारी। मातीमध्यें त्यायोगें ॥ ११२५ ॥ वेदें न कोणास टाकिलें। त्याचींच हीं अवघीं बाळें। अधिकारानुरूप कथन केलें। निरनिराळे विधि प्रत्येकां ॥ ११२६ ॥ ईश्वरस्मरण करण्याचा। अधिकार सर्वांस साचा। 'मां हि पार्थ' या श्लोकाचा। भावार्थ पहा गीतेमध्यें ॥ ११२७ ॥ या भक्तीच्या सेवनें। प्राणी क्रमाक्रमानें। जाईल मोक्षाकारणें। ती न वांया जात कधीं ॥ ११२८ ॥

## अतोह्यविपक्वभावानामपि तल्लोके ॥ ७९ ॥

परिपक्व दशेप्रती। ज्यांची नसे आली भक्ती। ते श्वेतद्वीपांत राहती। देहपातानंतर ॥ ११२९ ॥ भक्तांचे प्रकार तीन। कनिष्ठ मध्यम उत्तम जाण। गतीचेंही लक्षण। निरनिराळें तिघांचें ॥ ११३० ॥ मध्यम भक्त त्याला म्हणती। कीं मोक्षदायिनी पराभक्ती। ज्याच्या नसे आली हातीं। तो मध्यम भक्त समजावा ॥ ११३१ ॥ ऐसा तो मध्यम भक्त। त्याचा होतां देहपात। जातो श्वेतद्वीपांत। पुढचें अनुष्ठान करावया ॥ ११३२ ॥ हें श्वेतद्वीप परियेसीं। क्षीरसमुद्राच्या उत्तरेसी। आहे देवलोकासी। तेथले धर्म निराळे ॥ ११३३ ॥ या देवभूमीमाजीं जाण। मध्यम भक्त राहून। करीतसे अनुष्ठान। पराभक्ती साधण्याचें ॥ ११३४ ॥ त्या मध्यम भक्तांप्रती। यावें न लागे भूमीवरतीं। मृत्युलोकाची समाप्ती। मध्यम भक्तींनच झाली असे ॥ ११३५ ॥ महाभारत ग्रंथांत। कथा शांतिपर्वांत। तीनशें

सदतिसाव्या अध्यायांत । आहे ऐशी ती पहा ॥ ११३६ ॥ श्वेतद्विपींचे जन । चंद्राप्रमाणें देदीप्यमान । चित्तवृत्ती समाधान । ज्यांची राहे ऐसे ते ॥ ११३७ ॥ ते त्याच द्वीपीं राहून । करितातीं अनुष्ठान । त्या अनुष्ठानें होतें पूर्ण । त्यांची ती पराभक्ती ॥११३८॥ ज्यानें पराभक्तीकारण । मृत्युलोकींच केलें आकलन। त्या न राहिलें प्रयोजन । श्वेतद्वीपीं राहण्याचें ॥ ११३९ ॥ तो श्वेतद्वीपाभीतरीं । मुक्कामा येत पांथापरी । तो तेथें न थांबतां पुढारी । जातो पराभक्तीबळें ॥ ११४० ॥ श्रोते हे भक्त तिन्ही । देहपातानंतर जाणी । गमन क्रमाक्रमांनीं । करिती तो क्रम ऐसा असे ॥ ११४१ ॥ मध्यम आणि उत्तमाचा । क्रम येणें रितीं साचा । त्याग स्थूलदेहाचा । मृत्युलोकीं झाल्यावर ॥ ११४२ ॥ लिंगशरीरासमेवत । जाई वायुलोकांत । तेथून पुढें त्याचा होत । मुक्काम आदित्यलोकासी ॥११४३॥ पुढें चंद्रलोकाकारण । तो प्राणी करितो गमन । त्याच्यापुढें आहे स्थान । या श्वेतद्वीपाचें ॥ ११४४ ॥ यास ब्रह्मलोक कोणी म्हणती । कोणी श्वेतद्वीप नांव देती । येथें आपुल्या अनुष्ठानाची होती । पूर्णता ती विबुध हो ॥११४५॥ती सांगता झाल्यावरी । पराभक्ती येते करीं। ती करीं आल्यावरी । मोक्ष त्यासी रोकडा ॥ ११४६ ॥

## क्रमैकगत्युपपत्तेस्तु ॥ ८० ॥

श्रोते मध्यम भक्तासी । आणि तैसे उत्तमासी । मोक्षप्राप्ती निश्चयेंसी । मिळणार यांत शंका नसे ॥ ११४७ ॥ परी मध्यमाकारणें । क्रमाक्रमानें आहे जाणें । येणेंरितीं गमन करणें । आवश्य नोहे उत्तमाला ॥ ११४८ ॥ क्रमरूप ज्या ज्या गती । त्यांचीं नांवें येणें रितीं । अनिरुद्ध प्रद्युम्न बोलती । आणि तिसरी ती संकर्षण॥११४९॥ या तिहीं गतींची प्राप्ती । मध्यमाप्रती होती । व्यूह गती जी चवथी । त्या गतीनें मोक्ष पुढें ॥ ११५० ॥ श्रोते ही व्यूहगती । निराळी ना निश्चिती । तिन्हीही प्रत्यया येती । जेथें ती व्यूह होय ॥ ११५१ ॥ म्हणजे गतिरूप

जीं स्वरूपें तीन । त्या स्वरूपीं होऊन अनन्य । मिळविणें जें तिहींपासून । त्याला नांव व्यूह असे ॥११५२॥ म्हणजे तिहींच्या समुदायासी । हें व्यूह नांव परियेसीं । या व्यूहगतीनें परेसी । जाऊन मोक्षा पावे पुढें ॥ ११५३ ॥ म्हणजे पराभक्ता कारण । प्रद्युम्न अनिरुद्ध संकर्षण । या गतींचें प्रयोजन । मुळींच नाहीं ॥ ११५४ ॥ पराभक्ती सेवितां । व्यूहगती त्याच्या हातां । सहज येते तत्त्वतां । जावया मोक्षासी ॥ ११५५ ॥ मोक्षसाधक गतींचें महत्त्व मानूं नका साचें । तें साधकाच्या शक्तींचें । अनुरोधानें होत असे ॥ ११५६ ॥ कोणी आपुल्या इच्छित स्थला । जाण्या पायीं निघाला । कोणी भरधांव घोडा फेंकला । बैसूनियां त्याचे-वर ॥ ११५७ ॥ कोणी गेला विमानानें । कोणी गेला योग-साधनें । परी अवघ्यांकारणें । इच्छितस्थलाची प्राप्ती झाली ॥ ११५८ ॥ जो पायीं चालला त्यास । करावे लागले बहुवस । मुक्काम अन्य अन्य गांवास । इच्छित स्थलीं पोंचावया॥११५९॥ ज्यानें वारूस बसून गमन केलें । त्याचे मुक्काम थोडे झाले । ज्यानें विमाना सेविलें । त्याचा मुक्काम पखादा ॥ ११६० ॥ जो योगबलानें गेला । तो तात्काळ पोहोंचला । हे अवघे इच्छित-स्थला । पोहोंचले हें ध्यानीं धरा ॥ ११६१ ॥ म्हणजे गमन-क्रिये माझारीं । क्रम लागतो ऐशापरी । पदें गमनाची पायरी । कनिष्ठ आहे अवघ्यांत ॥ ११६२ ॥ उच्च त्याहून घोड्याची । त्याहून उच्च विमानाची । त्याहून उच्च योगाची । हें कोणीही जाणील ॥ ११६३ ॥ तोच मध्यम उत्तमाचा । न्याय आहे येथें साचा । मोक्ष लाभ व्हावयाचा ।आहे सारखा दोघांसी ॥११६४॥

उत्क्रांतिः प्रतिवाक्यशेषाच्च ॥ ८१ ॥

हें उत्क्रांति प्रकरण । जेथें जेथें शास्त्रामधून । केलें आहे श्रोते कथन । तेथें हीच गती निवेदली ॥ ११६५ ॥ उत्क्रांति म्हणजे उत्क्रमण । म्हणजे एक होणें एक टाकून । त्याअर्थीं प्रयोजन । आहे गतीचें आवश्य त्या ॥ ११६६ ॥ अष्टमाध्यायीं

गीतेचें । स्पष्ट विवरण आहे याचें । ' अग्निर्ज्योति ' श्लोकाचें । रहस्य येथें ध्यानीं धरा ॥ ११६७ ॥ म्हणजे ज्याचा जैसा अधिकार । त्या त्या प्रमाणें साचार । पायऱ्या क्रमून क्रमवार । मोक्षाप्रती जाय तो ॥ ११६८ ॥ भीष्माचार्य परमज्ञाते । परी वाट पहात होते । भारतग्रंथीं पहा ते । म्हणजे क्रमाचें महत्त्व कळे ॥ ११६९ ॥

## महापातकीनां त्वार्तौ ॥ ८२ ॥

महापातकी जे जे जन । त्या त्या लोकांकारण । आर्तभक्तीचें सेवन । करणें भाग प्रथमता ॥ ११७० ॥ म्हणजे आर्तभक्ती करण्याचा । अधिकार पापीजनांचा । जेंवी कां संमार्जनाचा । योग प्रथमता उकिडर्यासी ॥ ११७१ ॥ उकिडर्याची घाण । केल्या सडासंमार्जन । पूर्णपणें जाऊन । स्वच्छपणा त्या येतसे ॥ ११७२ ॥ मग काढितां त्यावरी । रंगवल्ली नानापरी । संमार्जनावीण भूवरी । रंगवल्ली ना शोभा दे ॥ ११७३ ॥ तेंवी पातक्याचीं पापें पूर्ण । आर्तभक्तीनें होती दहन । याच भक्तींत आहे गुण । पापें दहन करण्याचा ॥११७४॥ मलिन ज्याचें अंतःकरण । सर्वदा ज्यासी विषयस्मरण । ऐशा प्राण्यालागून । उपरती ती कशाची ॥ ११७५ ॥ ऐसें खरें आहे जरी । झालें असेल जन्मांतरीं । पुण्य कांहीं त्याच्या करीं । त्या हा योग येतसे ॥ ११७६ ॥ त्या अंशमात्र पुण्येंकरून । उपरतीचें होय जनन । परी पापाभिलाषें त्याचें मन । ती उपरती टिकूं न दे॥ ११७७ ॥ म्हणजे उपरतीच्या क्षणांत । त्यानें आठवितां ईशाप्रत । तेंच त्याच्या पापा होत । प्रायश्चित्त अनायासें ॥ ११७८ ॥ विषयवासना नाहीं गेली । त्या उपरतीच्या कालीं । तेथें गोष्ट इतुकीच घडली । ती ऐका सांगतों ॥ ११७९ ॥ ईशस्मरणाबरोबर । ईश्वर हा अतिथोर । तो पूर्ण करी साचार । निज भक्ताच्या मनीषा ॥ ११८० ॥ ऐसा सिद्धांत ठाम ठरतो। म्हणून तो ईश्वरा बाहतो । आणि विनंती ही करितो । माझी आस पुरवीं देवा

॥ ११८१ ॥ म्हणून श्रोते येणें रिती । पापी जनां आर्तभक्ती । सुगमसेव्य वाटती । म्हणून करिती सेवन ॥ ११८२ ॥ या आर्तभक्तीनंतर । पुढची भक्ती साचार । आहे श्रोते साधणार । आर्तभक्तिद्वार पहिलें ॥ ११८३ ॥ आणि अखेर जी पराभक्ती । येथें भक्तीचा शेवट निश्चिती । पराभक्तीनें मोक्ष हातीं । येतो हा सिद्धांत ॥ ११८४ ॥

## सैकांतभावो गीतार्थप्रत्यभिज्ञानात् ॥ ८३ ॥

एकांतसेवनें तत्त्वतां । पराभक्ती येत हातां । एकांताची पडली प्रथा । याचसाठीं विबुध हो ॥ ११८५ ॥ आतां एकांत या शब्दाचा । अर्थ येणें रिती साचा । जेथें अंत एकाचा । होतो तो एकांत ॥ ११८६ ॥ म्हणजे अवघें कांहीं जाऊन । एकविध भावें मन । विश्वाठायीं अवलोकन । जो करी एकाला ॥ ११८७ ॥ तोही त्याचा एकपणा । ज्या साधनें निमे जाणा । ऐशा त्या साधना । एकांत हें नाम असे ॥ ११८८ ॥ उगीच कोंडून घेतल्या खोलींत । वा गेल्या काननांत । वा बैसल्या गिरिकंदरींत । तो एकांत व्यावहारिक ॥ ११८९ ॥ पारमार्थिक एकांत । या एकांतें न प्राप्त होत । एकाविध जें चंचल चित्त । तें जाहलें पाहिजे ॥ ११९० ॥ एकविध चित्त तेव्हां होतें । जेव्हां कार्याचें कारण कळतें । तें कळतां साधक त्यातें । राहे निरंतर चिकटून ॥ ११९१ ॥ त्या एकपणाचा । अंत जेथें होतो साचा । तोच एकांत परमार्थाचा । ज्याला नांव पराभक्ती ॥ ११९२ ॥ आतां सूत्राचिये ठायीं । प्रत्यभिज्ञान हा शब्द पाहीं । त्याचें मर्म आहे कांहीं । तें आतां पाहूं या ॥ ११९३ ॥ या प्रत्यभिज्ञान शब्दानें । एकसमयावच्छेदानें । आहे तिहींचा बोध होणें । त्या गोष्टी येणें रिती ॥ ११९४ ॥ संस्कार आणि स्मरण । तिसरा तो अनुभव जाण । या तिहींचें ग्रहण । होतें याच शब्दानें ॥ ११९५ ॥ या एकांतिक धर्माचें । अनुष्टान किती महत्त्वाचें । हें भगवंत बोलला वाचें । भगवद्गीतेमाझारीं ॥ ११९६ ॥ महाभारतग्रंथीं भलें । भीष्मांनीं हेंच कथन केलें । म्हणून आतां वेगळें । त्याविषयीं कथणें नको ॥ ११९७ ॥

## परां कृत्वैव सर्वेषां तथाह्याह ॥ ८४ ॥

पराभक्तीच्या द्वारें जाण । नवविधा ज्या भक्ती गौण । त्याही होतील सोपान । मोक्षपेठेस पावावया ॥ ११९८ ॥ म्हणजे या गौणी भक्तीच्या सेवनीं । पराभक्ती उपजे जाणीं । आणि ती साधल्यावरी प्राणी । मोक्षाप्रती पावतसे ॥ ११९९ ॥ याच परा भक्तीचा । सांगोपांग विचार साचा । केला अती बहारीचा । भगवद्गीता ग्रंथानें ॥ १२०० ॥ या भगवद्गीता ग्रंथांत । वक्ता साक्षात् भगवंत । म्हणून त्याचे वचनाप्रत । मानलेंच पाहिजे ॥१२०१॥ 'भक्तिं मयि परां कृत्वा' । हा श्लोक अवश्य पहावा । आणि दृढतर विश्वास ठेवावा । लागावें या कार्यासीं ॥१२०२॥ म्हणजे गीतार्थाचें मनन । करून करणें आचरण । उगीच शब्द-पारायण । केल्या मोक्ष मिळणें नसे ॥ १२०३ ॥ केलेलें शब्द-पारायण । वृथा न जावें म्हणून । कांहीं आमिष दाखवून । गौणी भक्ती सांगीतल्या ॥ १२०४ ॥ मात्र त्या गौणी भक्तीप्रत । न द्यावें प्रधानत्व । त्या साधनीं करणें स्थित । या पराभक्तीच्या ॥१२०५॥ आतां ऐशी पराभक्ती । साधणें व्हावया ज्याची प्राप्ती । तो जगद्वंद्य जगत्पती । कोण हे पुढें कथतील ॥ १२०६ ॥ कैसा कोण सर्वेश्वर । याचा विचार आजवर । शास्त्रें ज्ञाते मुनिवर । संत साधू करीत आले ॥ १२०७ ॥ प्रकार विचार करण्याचे । जरी अलग अलग सर्वांचें । कर्तृत्व शक्तित्व ईश्वराचें । त्याच्या-सह मान्य असे ॥ १२०८ ॥ शास्त्रें मतें आणि पंथ । या वाटा साक्षात् । त्या अवघ्या येऊन मिळतात । पराभक्ती या महाद्वारीं ॥ १२०९ ॥ हें पराभक्तीचें द्वार । आहे अखेरचें साचार । ईश्वरा-कडे जो जाणार । तो याच द्वारांतून॥१२१०॥ऐसा तो अद्वितीय भगवंत । कैसा कोण कोठें स्थित । त्याचा उहापोह करितात । पुढच्या सूत्रीं शांडिल्य मुनी ॥ १२११ ॥ ( इति भक्तिमीमांसा द्वितीयाध्याय समाप्त )

( २. मूळ द्वितीयाध्याय समाप्त )

जय श्रीकृष्ण.

# अध्याय तिसरा

## ॐ भजनीयेनाद्वितीयमिदं कृत्स्नस्य तत्स्वरूपत्वात् ॥८५॥

ऐसा हा भजनीय ईश्वर । जो जगत्कारण जगदाधार । कोणाचाही न जाणार । तर्क तो याच्यापुढें ॥ १२१२ ॥ ऐसें हें ईशरूपी तत्त्व भलें । ब्रह्मांडा व्यापितें झालें । त्रिभुवनीं ही नाहीं उरलें । स्थान त्याच्या व्याप्तीविण ॥ १२१३ ॥ म्हणजे स्वरूप घ्या कोणतेंही । तेथें आहे तोच पाहीं । सोनें जेंवीं नगाठायीं । आहेच कीं भरलेलें ॥ १२१४ ॥ अस्ति भाति आणि प्रिय । हा ईशाचा होय ठाय । नाम आणि रूपें होय । बोध अस्तिभातीचा ॥ १२१५ ॥ म्हणजे आहे तरी ईश्वर । भासे तेंही ईश्वर । नामें आणि विकार । ईश हाच एक असे ॥ १२१६ ॥ नामरूपीं भिन्नत्व जरी । परी तत्त्वातें न बाधित करी । हीं नामें रूपें जगणारीं । आहेत मुळीं तत्त्वावर ॥ १२१७ ॥ रांजण डेरा घागर । चूल बोळकें साचार । हे मृत्तिकेचेच प्रकार । अवघ्या ठायीं मृत्तिका ॥ १२१८ ॥ घागर डेरा रांजणाचा । आकार निरानिराळा साचा । परी त्या आकारें मृत्तिकेचा । लोप नाहीं झाला कीं ॥ १२१९ ॥ तैसें प्रत्येक वस्तूप्रत । कारण ईश हाच सत्य । ऐसें याचें सामर्थ्य । म्हणून तो भजनीय असे ॥१२२०॥ द्वैत आणि अद्वैत । हे त्याचेच सिद्धांत । तत्त्व आणिल्या ध्यानांत । हा वाद सहज मिटे ॥१२२१॥ जैसें कां शरीरीं । चैतन्य तें निराकारी । त्याच्या योगें किंमत खरी । येते जड देहाला ॥ १२२२ ॥ नामरूप देहाला । नाहीं आंतील प्राणाला । तोच पाहिजे लाविला । न्याय याही जगातें ॥ १२२३ ॥ परी प्राणाची प्रचीती । देहामुळेंच निश्चिती । आणि देहाला ही किंमत ती । येते याच प्राणामुळें ॥१२२४॥ म्हणून अवघीं नामें आणि आकार । त्याचेच असती साचार । त्याच्या शक्तीचा प्रकार । अनुपम आणि दिव्य असे ॥ १२२५ ॥ अनिरुद्ध प्रद्युम्न संकर्षण । हीं स्वरूपें त्याचींच जाण । शिव आणि चतुरानन । हीं ही नांवें त्याचींच ॥१२२६॥ नाम आणि अवस्था । जरी भिन्न भिन्न सर्वथा । परी ती एकचि

व्यक्ती तत्त्वतां । तेथें भेद होणें नसे ॥ १२२७ ॥ जो लहान तोच तरुण । त्यालाच पुढें म्हातारपण । अवस्थाभेदेंकरून । व्यक्ती नाहीं बदलली ॥१२२८॥ नामरूप मायेचें । अस्ति भाति ईशाचें । एकी-करणें या दोहींचें । तेंच अवघें हें जग पहा ॥ १२२९ ॥ नामरूप दुनिया सारी । ती नाशिवंत विकारी । परि ही ज्याची झाली खरी । तो मात्र अविनाश ॥ १२३० ॥ ऐशा त्या अनुपम्य तत्त्वाप्रती । कांहीं लोक ब्रह्म म्हणती । आणि त्यालाच कांहीं देती । नाम श्रीवासुदेव ॥१२३१॥ ब्रह्म हेंही नांव । वासुदेव हेंही नांव । हीं दोन्हीं नांवें दाविती ठाव । त्या एकाच तत्त्वाचा ॥ १२३२ ॥ ऐसा तो अद्वितीय म्हणून । करण्या योग्य आहे भजन । त्या भजनाचें साधन । जें तें हीच भक्ती पहा ॥ १२३३ ॥ ईश कैसा व्यापक । आणि शक्ती कैसी अलोलिक । तें कथिलें आहे देख । पुढील सूत्रामाझारीं ॥ १२३४ ॥

## तच्छक्तिर्माया जडसामान्यात् ॥ ८६ ॥

त्या ईशाची शक्ती । अगम्य आहे अती । ती दोन प्रकारें प्रत्यया येती । चेतन आणि जड रूपें ॥ १२३५ ॥ म्हणजे त्या ईशशक्तीचे । दोन प्रकार असती साचे । चेतन जड स्वरूपांचे । हें वर कथिलें कीं ॥ १२३६ ॥ चेतनस्वरूप जी प्रकृती । ती परा होय निश्चिती । अपरे ठायीं भेद असती । पहा आठ प्रकारचे ॥ १२३७ ॥ मन बुद्धि अहंकार । आणि पंचभूतें साचार। हे जे असती प्रकार । ते अपरा प्रकृतीचे ॥ १२३८ ॥ अष्टधा प्रकृती अपरा । आणि चैतन्यात्मक प्रकृती होय परा । या दोन्हीं मुळें आकारा । विश्व अवघें आलें असे ॥१२३९॥ परी या दोन्ही प्रकृतींचा । अधिष्ठाता ईशचि साचा । अध्याय सातवा गीतेचा । पहा म्हणजे कळेल हें ॥ १२४० ॥ चतुर्थ-पंचम श्लोकांत । जें सांगता झाला भगवंत । तें आणा ध्यानांत । म्हणजे फोड कळेल ही ॥ १२४१ ॥ या दोहों प्रकारच्या प्रकृतींशीं । ईश कारण निश्चयेंसीं । तो प्रकृतीच्या साह्यें जगाशीं । यंत्राप्रमाणें फिरवीतसे ॥ १२४२ ॥ 'भ्रामयन् सर्वभूतानि' । ऐशी आहे

ईशवाणी । शक्ती ही ईशापासूनी । भिन्न नसे केव्हांही ॥१२४३॥ ईश आणि त्याची शक्ती । म्हणजेच पुरुष निश्चिती । त्या पुरुषाला नटवीती । झाली प्रकृती जगदाकार ॥ १२४४ ॥

व्यापकत्वाद्व्याप्यानाम् ॥ ८७ ॥

श्रोते व्याप्य वस्तूचा । व्यापक परमात्मा होय साचा । त्या ठिकाणीं दुसऱ्याचा । लाग न लागे यत्किंचित ॥ १२४५ ॥ ईशाची जी व्यापक शक्ती । ती प्रकृतीनें घेऊन हातीं । करिती झाली जगदुत्पत्ती । केवळ आपुल्या कर्तृत्वें ॥ १२४६ ॥ प्रकृती आहे कर्तृत्ववान् । इचें मोठें कुशलपण । व्यापकत्व मोडा घेऊन । ब्रह्मांडवृक्ष उभारिला ॥ १२४७ ॥ पहा घटाकाश मठाकाश । आकाशीं ना भेद खास । घटोपाधीनें त्यास । घटाकाश होणें आलें ॥१२४८॥ तैशीच येथें स्थिती । या प्रकृतीची निश्चिती। प्रकृतीचीं कार्यें तीं । दोन प्रकारें विबुध हो ॥१२४९॥ परमात्म्याचें जें स्फुरण । तेंच होय प्रकृती जाण । तिलाच आहे अभिधान । माया हें विबुध हो ॥१२५०॥ हें स्फुरण ज्याला झालें । तें त्यापून ना निराळें । जैसें लहरींनीं झांकिलें । जलाच्या शुद्ध स्वरूपा ॥ १२५१ ॥ हेंच झालेलें स्फुरण । दोन प्रकारचें आहे जाण । याचें झालें विवेचन । पूर्वीच्या सूत्रामधें ॥ १२५२ ॥ आतां अपरा प्रकृतीस । तत्त्वें असतीं चोवीस । तीं क्रमाक्रमानें उदयास । एकापुढें एक येती ॥ १२५३ ॥ श्वेताश्वतर उपनिषदीं तें । हेंच कथिलें आहे निरुतें । ती ऋचा देतों येथें । 'बहुस्यां प्रजा ये येति' ॥ १२५४ ॥ ही स्फुरणात्मक शक्ती । त्रिगुणात्मक निश्चिती । हीच शक्ती जन्मदेती । प्रथमता बुद्धिकारणें ॥१२५५॥ बुद्धीमाजीं तीन गुण । मोह चलन आणि ज्ञान । या बुद्धीनें निर्माण । केलें अहंकाराला ॥ १२५६ ॥ हा ही आहे त्रिगुणात्मक याच्या सत्त्वांशें मन देख । रजापासून निःशंक । उत्पत्ती झाली दहांची ॥ १२५७ ॥ ज्ञानेंद्रियेंही पंच । कर्मेंद्रियेंही पंच । तमांशानें साच । पंचतन्मात्रा जन्मल्या ॥१२५८॥ पंचतन्मात्रांपासून ।

पंचभूतें निर्माण। परी हें प्रत्येक ठिकाण। ईशानेंच व्यापिलें ॥ १२५९ ॥ प्रकृती महत्तत्व अहंकार। इंद्रियें अकरा साचार। पंचतन्मात्रा येथवर। एकोणीस ही संख्या झाली ॥ १२६० ॥ त्यापरी पंचभूतें। यासी मिळवितां होते। बेरीज ती पहा श्रोते। चोवीस मुख्य तत्त्वांची ॥ १२६१ ॥ या चोवीस तत्त्वांचा। समावेश अपरेंत साचा। शेष उरलें त्यांचा। समावेश परेमध्यें ॥ १२६२ ॥ या जडचेतनांचें एकीकरण। तेंच हें विश्व पूर्ण। चेतनशा जीवाकारण। यांतून मुक्त होणें असे ॥ १२६३ ॥ म्हणून त्या मुक्त व्हावया। या भक्तीच्या सदुपाया। तें न जाऊं द्यावें वांया। अभ्यासून पहा तें ॥ १२६४ ॥

## न प्राणी बुद्धिभ्योऽसंभवात् ॥ ८८ ॥

निर्माणत्व जगताचें। आहे ईश्वराकडे साचें। तेथें प्राणिमात्राचें। महत्त्व नाहीं विबुध हो ॥ १२६५ ॥ कार्य पहा कोणतेंही। बुद्धिमान करी पाहीं। बुद्धिमानावीण नाहीं। कार्याकार्यत्व येणें तें ॥ १२६६ ॥ प्राणी सृष्टीनंतर। ज्या अर्थीं साचार। त्या अर्थीं न होणार। कर्ता तो ब्रम्हांडाचा ॥ १२६७ ॥ तस्मात् हें जगत। बुद्धिमान जो भगवंत। त्यानें निर्मिलें साक्षात्। कां कीं कार्यब्रम्ह तो असे ॥ १२६८ ॥ आतां एकुणपन्नास सूत्रांत। कारुण्यानें होऊन युक्त। निर्माण करी सृष्टीप्रत। भगवान् ऐसें कथन केलें ॥ १२६९ ॥ तें कारुण्य कैशापरी। हें सांगतील पुढारी। एकुणनव्वदाच्या आधारीं। तें आतां श्रवण करा ॥ १२७० ॥

## निर्मायोच्चावचं श्रुतीश्च निर्मिमीते पितृवत् ॥ ८९ ॥

उच्चनीचप्रकारची। सृष्टी निर्मूनिया साची। आपुल्या त्रिविधतापाची। होळी जीवानें करावया ॥ १२७१ ॥ वेदही त्यानें निर्मिले। कारुण्य आपुलें दाविलें। आणि किंचित

जीवाला पोहोंचविलें । पराभक्तीच्या महाद्वारीं ॥ १२७२ ॥ कां कीं महापुरुषार्थ जो मोक्ष त्याची । एक पराभक्तीवीण साची । प्राप्ती कधीं न व्हावयाची । हें वेदाधारें सांगितलें॥१२७३ आणि तेंही कथिलें साधनासहित । ऐसा कृपाळू भगवंत । जेंवी बाप पुत्राप्रत । सुखसोई करून ठेवी ॥ १२७४ ॥ त्या कृपाळू बापापरी । भगवान् सृष्टी निर्माण करी । येथें एक शंका ऐशापरी । उत्थान पावे श्रोते हो ॥१२७५॥ ईश्वरानें वेदाधारी। मोक्षमार्ग कथिला जरी । मग त्याच मार्गीं दुनिया सारी । कां न पावली मोक्षातें ॥ १२७६ ॥ परी ही शंका बालिश । ईश्वराकडे न त्याचा दोष । पहा पिता पुत्रास । सुखसोई करून ठेवी ॥ १२७७ ॥ म्हणजे पुत्रें नांदावें सुखांत । हा पित्याचा आहे हेत । आणि त्या सुखाप्रीत्यर्थ । इस्टेट ठेवी मिळवून ॥ १२७८ ॥ त्या इस्टेटीचें संरक्षण । होई कोणत्या प्रकारेंकरून । हेंही ठेविलें लिहून । त्या दयाघन बापानें ॥ १२७९ ॥ जें त्यानें लिहिलें कांहीं । तें स्वानुभवानें शुद्ध पाही । तैसें वागल्या येणेंच नाहीं । कदापिही वाईट फळ ॥ १२८० ॥ ऐसें सत्य असून । पुत्र बापाचें लिखाण । निरर्थक समजून । झुकला स्वैर वृत्ती-कडे ॥ १२८१ ॥ स्वैरवृत्ती बळावतां । इस्टेट संपली हां हां म्हणतां । याचा काय दोष माथां । ठेवितां ये पित्याच्या ॥१२८२॥ येथें इस्टेट पित्यानें मिळविली । ती संभाळण्या कारणें भली । आज्ञाही त्यानेंच केली । हें येथें विसरूं नका ॥ १२८३ ॥ आज्ञा तुडविली म्हणून । येतें झालें हीनपण । त्या पुत्राकारण । बाप त्याला दोषी नसे ॥ १२८४ ॥ ही एक बाजू झाली । आतां दुसरी राहिली । कोणी म्हणतील नाहीं केली । वेदाज्ञा शुद्ध हेतूनें ॥ १२८५ ॥ या तुमच्या वेदांत । आज्ञा आहेत असंख्यात । त्यांची एकवाक्यता सत्य । नाहीं अशी कोठेंच ॥ १२८६ ॥ पुत्रवत हें जगत् । निर्माता झाला भगवंत । आणि वेदही पुत्रवत् । त्यानेंच केले निर्माण ॥ १२८७ ॥ ऐसें आहे सूत्राठायीं । त्याचा मथितार्थ ऐसा पाही । तो निमित्तकारण होई । सृष्टि उत्पन्न करतांना ॥ १२८८ ॥ पहा पुत्रातें जन्म देता । जो कां

आहे त्याचा पिता । तोही निमित्त कारण तत्त्वता । झाला हें विसरूं नका ॥ १२८९ ॥ पहा रज आणि रेत । यांच्या संयोगें पिंड बनत । येथें प्रत्यक्ष कर्तृत्व । नाहीं येत ईशाकडे ॥ १२९० ॥ रेतरजाची शक्ती । निसर्गनियमें उदया येती । जैशी कां ती वाफ होती । अग्निजलांच्या संयोगें ॥ १२९१ ॥ क्रिया वाफ होण्याची । आहे पहा निसर्गाची । अग्नी आणि जलपणाची । लीला मात्र त्याची असे ॥ १२९२ ॥ येथें वाफ व्हाया जाण । परमात्मा आहे निमित्तकारण । तैसें पुत्रोत्पत्तीलागून । पिता निमित्त कारण असे ॥ १२९३ ॥ तैसें या वेदाचें । नाहीं नाहीं श्रोते साचें । तें पूर्वीच्याच कल्पाचें । आहे तेंच काढी पुन्हां ॥ १२९४ ॥ म्हणजे पूर्व कल्पाच्या वेळीं । सृष्टी जी का संपली । ती अवघ्या तत्त्वांसह विराली । भगवंताच्या रूपांत ॥ १२९५ ॥ त्या तत्त्वांपरी वेद च्यार । विलीन झाले साचार । परमात्मस्वरूपीं अखेर । कांहीं न या पलीकडे ॥ १२९६ ॥ म्हणजे अनंत वेळां कल्प झाले । परी वेद तसेच राहिले । तेच ईशें प्रगट केले । सृष्टीच्या आरंभाला ॥ १२९७ ॥ ' धाता यथा ' या मंत्रांत । श्रुतीनें कथिलें हेंच सत्य । म्हणून अपौरुषेय वेदांप्रत । येतें आहे जहालें ॥ १२९८ ॥ या वेदांचा अधिकार । आहे थोर साचार । सुखदुःखांचा विचार । वेदानेंच कथन केला ॥ १२९९ ॥ या वेदाच्या साह्यानें । आहे जीवाकारणें । निजस्वरूपाचें ज्ञान होणें । मोक्षाप्रती जावया ॥ १३०० ॥

## मिश्रोपदेशान्नेति चेन्न स्वल्पत्वात् ॥ ९० ॥

श्रोते वेदांमाझारीं । मिश्रोपदेश नानापरी । परी फलही त्याचें त्याचपरी । अल्प ऐसें कथन केलें ॥ १३०१ ॥ म्हणजे अल्प फलाचीं साधनें । कथिलीं त्याच वेदानें । आणि मोक्ष मिळतो कशानें । हेंही कथिता वेदची ॥ १३०२ ॥ जग शहाणें करण्या भलें । प्रथम कर्मकांड प्रतिपादिलें । जैसें पंतोजीनें शिकविलें । मोठें अक्षर प्रथमता ॥ १३०३ ॥ तें मोठें अक्षर

वळल्यावर । फरडा होतो लिहिणार । तो वेदच्या वेद भराभर। लिहूनियां टाकीतसे ॥१३०४॥ या वेळीं अक्षराचा । थोर आकार निमाला साचा । तोच न्याय वेदाज्ञेचा । आहे हें विसरूं नका ॥ १३०५ ॥ आतां कित्येक म्हणतील यापरी । वेद उन्मत्त प्रलाप करी । कां कीं एकवाक्यता नाहीं खरी । या वेदाच्या सांगण्यांत ॥ १३०६ ॥ पहा 'वायव्यं श्वेतमालभेत्' । ऐसा हिंसाविधी सांगत । आणि तोच पुढें सांगत । 'न हिंस्यात्सर्वभूतानि' ॥ १३०७ ॥ तैसें चातुर्मास्य यज्ञानें । अक्षय्य सुख आहे मिळणें । तोच पुढें ऐसें म्हणे । मोक्षप्राप्ती ना कर्मासी ॥ १३०८ ॥ ऐसा उन्मत्त प्रलाप करणारा । ज्याअर्थी वेद खरा । मग तोच हरीच्या द्वारा । सोडण्यातें समर्थ कसा ॥ १३०९ ॥ अहो ज्याच्या भाषणांत । मेळ नाहीं यत्किंचित् । त्याचें म्हणणें आधारभूत । धरणें चुकीचें होईल कीं ॥ १३१० ॥ ऐसें चार्वाक म्हणतील । परी तें म्हणणें आहे फोल । मन करूनि निश्चल । वेदाज्ञेचा विचार करा ॥ १३११ ॥ साधारणतः मानवाचा । ओढा ऐहिक सुखाकडे साचा । तो पुढचा आणि मागचा । विचार मुळीं करीत नसे ॥ १३१२ ॥ मी जन्मलों कशानें । वा पुढें मजला कोठें जाणें । ह्या दोन्ही विचाराचें उणें । त्याच्या ठायीं वसतसे ॥ १३१३ ॥ तें उणें आहे म्हणून । तो ऐहिक सुखा हपापे जाण । त्याचें करण्या समाधान । कर्मकांडाची प्रवृत्ती ॥ १३१४ ॥ तो ज्या ज्या सुखाची । इच्छा मानव करी साची । तीं पूर्ण करून घ्यावयाचीं । साधनें कथिलीं कर्मानें ॥ १३१५ ॥ लक्ष्मीची असल्या वाण । हिरण्यसूक्ताचें अनुष्ठान । पुत्र व्हाया लागून । पुत्रकामेष्टी यज्ञ पहा ॥ १३१६ ॥ सार्वभौमत्वाचा मिळावा । मान ऐसें वाटल्या जीवा । त्यानें अश्वमेध करावा । ऐसे प्रकार किती तरी ॥ १३१७ ॥ त्या कर्मांतर्गत अनुष्ठानें । आहे इच्छित वस्तू प्राप्त होणें । त्या ऐहिक सुखाच्या सेवनें । पुढें कंटाळे तोच जीव ॥ १३१८ ॥ हा जो कांहीं कंटाळत । तो सत्त्वगुणामुळें सत्य । कां कीं श्रोते अनुष्ठानांत । जाय सत्त्वगुण बळावला ॥ १३१९ ॥ रजतमाच्या योगानें । आशायुक्त

होतीं मनें । सत्त्वगुणाच्या वाढीनें । विवेक तो उपजतसे ॥ १३२० ॥ अनुष्ठान काम्य असलें जरी । तरी वांया न जाय सर्वतोपरी । विवेक उपजे अंतरीं । अनुष्ठानाच्या पुण्यांशें ॥ १३२१ ॥ ऐहिक सुखाचा आला वीट । मग तो मोक्षाची हुडकी वाट । त्याच वेदाचा चोखट । उपनिषद् भाग अभ्यासी ॥ १३२२ ॥ म्हणजे ऐहिक आणि पारमार्थिक । सुखोत्पत्तीचीं साधनें देख । एकाच वेदानें निःशंक । आहेत कीं कथन केलीं ॥ १३२३ ॥ या सर्व आज्ञा करण्याचा । हेतु इतकाच वेदाचा । कर्त्या पुरुषास अडचणीचा । संबंध न यावा कोठेंही ॥ १३२४ ॥ अवस्था असतां किशोर । तेथें लालनाचा प्रकार । पिता असोनियां चतुर । कैसें करी तें पहा ॥ १३२५ ॥ रिंगणें गोस्या देई तोच । पांगुळगाडा देई तोच । पुढें घोडाही देई साच । बसावयाकारणें ॥ १३२६ ॥ या तिन्हींही साधनांचा । हेतु हाच आहे साचा । मुलगा समर्थ करण्याचा । पित्याचा सर्व बाजूंनीं ॥ १३२७ ॥ म्हणून वेदाकारण । उन्मत्त प्रलाप हें विशेषण । न द्या शहाण्या लागून । वेडा म्हणणें बरें नव्हे ॥ १३२८ ॥ काम्यकर्मानें विटोनी । विवेकी झाल्या प्राणी । तोच होतो पुढें धनी । या ईश्वरी ज्ञानाचा ॥ १३२९ ॥ मग तें ज्ञान झाल्यावर । काम्य कर्माचा पडे विसर । त्याच्या दृष्टीसमोर । ईश्वर हाच विषय राही ॥ १३३० ॥ ऐशी स्थिति आल्यावरी । तो पराभक्तीचा अधिकारी । एवं च आहे सर्वतोपरी । भजनीय हा ईश्वर ॥ १३३१ ॥ आतां अवघ्या कर्मांचा फलदाता । कोण आहे तत्त्वता । ऐशी अलौकिक सत्ता । आहे हातीं कवणाच्या ॥ १३३२ ॥ पुढील सूत्रीं हा विचार । येणार आहे साचार । शांडिल्यमुनी महाथोर । काय म्हणती तें ऐका ॥ १३३३ ॥

## फलमस्माद्बादरायणो दृष्टत्वात् ॥ ९१ ॥

फल विशिष्ट कर्मांचें । विशिष्ट परमात्मा देई साचें । ऐसें श्रीबादरायणाचें । मत स्वानुभवाचें असे कीं ॥ १३३४ ॥ आतां

या सूत्रांत। घोटाळा होईल समजुतींत। कां कीं जैमिनी ऐसें म्हणत। फळ कर्माचें कर्म देई ॥ १३३५॥ म्हणजे कर्मानुष्ठानें करून। अपूर्वाचें होतें जनन। आणि त्या अपूर्वापासून। फल कर्त्याच्या पदरीं पडे ॥ १३३६॥ हीं कर्मं अवघीं परी। जड आहेत निर्धारीं। फळ देण्याचें अधिकारी। जड हें नाहीं मुळींच ॥ १३३७ ॥ देण्याघेण्याचा व्यवहार। चेतन करी साचार। त्यावीण हा अधिकार। येत नाहीं कवणातें ॥ १३३८॥ पहा सेवा-सेवक-सेव्यातें। या तिहींनीं सेवा होते। परी त्याला फळ मिळतें। सेव्याच्याच कृपेनें ॥ १३३९ ॥ सेवा राजाची बहू केली। निरलसपणें भली। परी कृपा न झाली। तरी राजाची निरर्थक ॥ १३४० ॥ वा जेंवी हलधर। पेरणी करी साचार। परी पीक येण्याचा प्रकार। जमिनीच्या कृपेवरी ॥ १३४१ ॥ कृपा होण्या जमिनीची। साधन हीच साची। अवघ्या कृषी-कर्माची। झाली पाहिजे पूर्तता॥१३४२॥ तेव्हांच ती कृपा करी। आणि अपार पीक देई खरी। येथें आहे त्याच परी। सेव्य आणि सेवकांत ॥ १३४३ ॥ सेव्य आहे जमीन। सेवा कृषीकर्म पूर्ण। शेतकरी हा सेवक जाण। त्या फळातें इच्छिता ॥१३४४॥ तेंवीं अवधीं साधनें ही सेवा। आचरितां सेवक बरवा। परी तो सेवाविधी व्हावा। पात्र सेव्याच्या कृपेसी ॥ १३४५ ॥ पुण्यश्लोक जैमिनींनीं। साधनें ठेविलीं कथूनी। पुढें जे वदली त्यांची वाणी। अपूर्व होते म्हणून ॥ १३४६ ॥ या म्हणण्याचा मथितार्थ। इतुकाच आहे सत्य। साधनावांचून नाहीं होत। साध्य वस्तूची सिद्धी कधीं ॥ १३४७ ॥ साधनाची पूर्तता। झाल्यावांचून सर्वथा। ज्ञाता न होय सांगता। साध्याचिया शक्तीस ॥ १३४८ ॥ पहा वाफ व्हावया गतिमान्। आहे यंत्राचें प्रयोजन। येथें जरी दिलें सांगून। गतिमान् आहे वाफची ॥ १३४९ ॥ हें एखादा खरें मानील। आणि यंत्र करण्याचें टाकील। प्रयत्नावांचून लागेल। नादीं वाफ गतीच्या ॥१३५०॥ म्हणून यंत्रें होईपर्यंत। वाफ आगगाडी ओढीत। हें मर्म सांगणें गुपित। ठेविलें पाहिजे अध्यापका ॥ १३५१ ॥ तैसें श्रीजैमिनींनें

केलें। साधनासी वर्णिलें। अपूर्व सांगून ठेविलें। गुप्त साध्याच्या शक्तीस ॥ १३५२ ॥ तेवींच झाले जाण। जैमिनी आणि बादरायण। हे दोघेही समसमान। आहेत कीं अधिकारी ॥ १३५३ ॥ म्हणजे जैमिनीनें यंत्र केलें। चालावया कारण भलें। तें बादरायणें कथिलें। नुसतें यंत्र चालेना ॥ १३५४ ॥ म्हणून या यंत्रा ठाया। चालण्याची गती याया। वाफकृपा लागे व्हाया। ती हातीं सारथ्याच्या ॥ १३५५ ॥ येथें सारथी हा ईश्वर। कृपा वाफ साचार। साधनें जीं कां इतर। ती यंत्रसामुग्री ॥१३५६॥ 'आयुर्वै घृतं' ऐसें। एक वाक्य शास्त्रीं असे। त्याचा अर्थ होतसे। घृत हेंच आयुष्य ॥ १३५७ ॥ या वाक्याचा अर्थ तोही। येणें रीतीचि आहे पाहीं। तूप हें साधन होई। आयुष्यवृद्धीकारणें ॥१३५८॥ जेथें आयुष्यचि नसेल। तेथें घृत काय करील। ऐसीच आहे सकल। योजना शास्त्रवाक्याची ॥ १३५९ ॥ म्हणून फल कर्माचें। कर्माप्रमाणें देई साचें। ईश्वर येथें कोणाचें। दुमत होणें नसे कीं॥१३६०॥ येथपर्यंत सृष्टीची। रहाटी कथिली साची। आतां गती लयाची। पुढील सूत्रांत सृष्टीच्या ॥ १३६१ ॥

## व्युत्क्रमादप्ययस्तथाहि दृष्टम् ॥ ९२ ॥

ज्या क्रमानें सृष्टी होते। त्याच्या उलट विलया जाते। पहा गुंडाळितां वस्त्रातें। हाच अनुभव येतो कीं ॥ १३६२ ॥ म्हणजे जिकडून गुंडाळा करावा। त्याच्या उलट सोडावा। हाच क्रम आहे बरवा। सृष्टोत्पत्तिलयाचा ॥ १३६३ ॥ सत्याऐंशीव्या सूत्राठायीं। सृष्टोत्पत्ति कथिली पाहीं। आतां या सूत्राठायीं। लयगतीचें वर्णन ॥१३६४॥ पंचभूतात्मक जगत। त्या पंचभूतांचा लय सत्य। होतो तमोगुणांत। तमोगुण तो रजामध्यें ॥ १३६५ ॥ सत्त्वगुणीं मिळे रज। सत्त्व अहंकारी सहज। अहंकाराचा निमे ध्वज। महत्तत्वामाजीं पहा ॥ १३६६ ॥ पुढें तेंही महत्तत्व। विलीन होतें प्रकृतींत। प्रकृतीचा होतो अंत। अखेर ईश्वरस्वरूपीं ॥ १३६७ ॥ म्हणजे आरंभीं आहे ईश्वर। आणि तोच

आहे अखेर। मध्यें जो झाला व्यापार । तें स्वरूप सृष्टीचें ॥ १३६८ ॥ आतां कोणी ऐसें म्हणती । जेंवी वस्तूची होय उत्क्रांती । त्याच क्रमें अपक्रांती । होत नाहीं तियेची ॥ १३६९ ॥ बीजापासून झाला मोड । मोडाचेंच होय खोड । त्याची अवस्था पुढें झाड । फांद्या पानें फुलें फळें ॥ १३७० ॥ मग अपक्रांतीचे वेळीं । फळ पाहिजे झाली कळी । कळीपुढें पान डहाळी । डहाळीपुढें खोड मोड ॥१३७१॥ परी ऐसें कधीं न घडतें । ज्या क्रमें झाड वाढतें । त्याच क्रमें तें न जातें । विलयासी कधींही ॥१३७२॥ परी हें म्हणणें तर्कशून्य । बीजासी करा अवलोकन । म्हणजे येईल कळून । प्रकार त्याच्या गतीचा ॥ १३७३ ॥ बीज जेव्हां तयार झालें । तेव्हां भौतिक व्यापार संपले । ते एकवटून अवघे आले । बीजाचिया ठिकाणीं ॥ १३७४ ॥ बीज-नाशाबरोबरी । त्यांचाही अंत निर्धारी । बीज हीच परिणत खरी । अवस्था त्या अवघ्यांची ॥१३७५॥ जैसे वऱ्हाड शब्दांत । अवघ्यांचा समावेश होत । व्याही विहीण वाजंत्रीं सत्य । उपाध्याय नी सोयरे ॥ १३७६ ॥ तैसें बीजाठायीं भलें । फूल पान खोड आलें । तें न राहिलें निराळें । अवघें संचलें बीजांत॥१३७७॥ एवंच ईशापासून । सृष्टी होते निर्माण । आणि तेथेंच लया पावे जाण । म्हणून भजनीय ईश हा ॥ १३७८ ॥ अहो श्रोते एथवर। भजनीय जो ईश्वर । त्याचा झाला विचार । सृष्टीसहीत साकल्यें ॥ १३७९ ॥ आतां सेवक जो जीव त्याची । काय वाट लागायाची । बद्ध आणि मुक्ताची । समरसता होय का ॥१३८०॥ ऊहापोह या प्रश्नाचा । पुढील सूत्रीं आहे साचा । काय बोलिली शांडिल्यवाचा । तें आतां अवधारा ॥ १३८१ ॥

( तृतीयाध्याय समाप्त )

## तदैक्यं नानात्वैकत्वमुपाधियोगहानादादित्यवत् ॥ ९३ ॥

जीव आणि भगवंत। हें एकचि आहे तत्त्व। जीव प्रकृतीसहित। लय पावतो भगवंतीं ॥ १३८२ ॥ परी अनेकत्व त्यांचें। जें भासतें जीवांचें। तें उपाधीमुळें साचें। मूळचा नाहीं भेद तेथें ॥ १३८३ ॥ ईश बिंबासमान। त्याचें प्रतिबिंब जीव जाण। प्रतिबिंबाचें असणेंपण। उपाधीनें प्रत्यया ये ॥ १३८४ ॥ ती उपाधी काढून घेतां। दोघे एकचि तत्त्वतां। ह्या अफाट जगीं पाहतां। कांहीं न त्या ईशाहून ॥ १३८५ ॥ सर्व कांहीं तोच झाला। उपाधीच्या साह्यें भला। आणि शेवटीं तोच उरला। प्रलय सृष्टीचा झाला जें ॥ १३८६ ॥ 'सर्वं खल्विदं ब्रह्म'। हें श्रुतिवाक्य अत्युत्तम। उपाधीनें होतो भ्रम। ईशतत्त्वाविषयींचा ॥ १३८७ ॥ 'तत्त्वमसि' वाक्यासी। हेंच रहस्य निश्चयेसी। आहे ईश या विश्वासी। अंतर्बाह्य व्यापून ॥ १३८८ ॥ रविप्रकाश सर्वा ठायीं। जैसा आहे व्यापक पाहीं। तेंचि आहे नवलाई। या ईशाची विबुध हो ॥ १३८९ ॥ ज्या अर्थीं त्याचें स्फुरण। आहे हें जगत जाण। तरी स्फुरण हें स्फुरणाहून। नाहीं निराळें अनुभव हा ॥ १३९० ॥ आतां द्वैत आणि अद्वैत मतीं। आपापल्या मतें लाविती। त्या जीवब्रह्माची संगती। येविषयीं शंका नसे ॥ १३९१ ॥ अद्वैत मतें आत्म्याचा। विचार आहे केला साचा। आणि द्वैतांनीं देहाचा। त्याच्या विचार केला असे ॥ १३९२ ॥ जो परमात्मा निराकारी। तोच होतो साकारी। हें ऐसें मानल्यावरी। वाद मिटेल तयांचा ॥ १३९३ ॥ आतां कांहीं असल्यावांचून। त्याचें न होय वर्णन। वर्णन झालें म्हणून। आकार आहे हें सिद्ध होतें ॥ १३९४ ॥ परी आकार नाशिवंत। ऐसें आहे एक मत। तेंही आहे खरें ठरत। त्याचा प्रत्यय घडोघडीं ॥ १३९५ ॥ पहा मडकें एक केलें। तें आकारातें आणिलें। तें जेव्हां नाश पावलें। तेव्हां उरली माती शेष ॥ १३९६ ॥ मातीचा आकार गेला। परी मातीचा नाहीं झाला। नाश बुध हो तेथें

भला । हें ध्यानीं धरावें ॥ १३९७ ॥ परी ती उरलेली माती । कांहीं तरी आहेच ती । तीच वाटे आहे स्थिती । या आत्म्याची निःशंक ॥१३९८॥ म्हणजे निर्गुण तरी रूप त्याचें । आणि सगुण तरी रूप त्याचें । हें मडकें खापराचें । पाहतां येईल कळोन ॥ १३९९ ॥ येथें जो का आकार । तोच सगुण साचार । आणि माती पुरी निराकार । तत्त्वही आहे तेथेंच ॥ १४०० ॥ वा घट या उपाधीनें । घटाकाश आहे म्हणणें । त्या भेदाला जे कां शाहणे । ते मुळीं न मानतलि ॥ १४०१ ॥ उपाधिनाशाबरोबरी । भेदही संपे सर्वतोपरी । तत्त्व मात्र अखेरीं । त्रिकालाबाधित उरलेंच ॥ १४०२ ॥ तेंवी उपाधिभेदें करून । जीव भासती भिन्न भिन्न । हेंच केलें कथन । क्षेत्रक्षेत्रज्ञ अध्यायांत ॥ १४०३ ॥ त्या उपाधि-नाशासी । पराभक्तीच निश्चयेसीं । येणार आहे उपयोगासी । म्हणून तीतें स्वीकारा ॥ १४०४ ॥

## पृथगिति चेन्न परेणासंबंधात् ॥ ९४ ॥

भोगणारे सुखदुःख । जीव भिन्न भिन्न कीं एक । परी ते नसती पृथक । ते असती ईशांश ॥ १४०५ ॥ हा सूत्राचा अर्थ झाला । आतां मथितार्थ राहिला । तोही येथें विशद केला । यथा-मती श्रोते हो ॥ १४०६ ॥ जीव सुखदुःखाप्रत । कर्मानुरोधें भोगीत । आणि ईश आहे अलिप्त । सुखदुःखापासोनी ॥१४०७॥ ऐसें आहे ज्या अर्थी । जीव नसावा त्या अर्थी । ईश्वराचा अंश निश्चिती । ऐसें विचारें ठरतसे ॥ १४०८ ॥ जें जें असतें पृथक । तें तें न होई कदा एक । पाषाण पाण्यामाजी देख । विराला हें न ऐकिलें ॥ १४०९ ॥ जे निजधर्में समान असतें । तें न कधीं एक होतें । पहा दीप आणि रवीतें । म्हणजे कळून येईल ॥ १४१० ॥ दीप राहे दीपाठायीं । तो तेजोधी रवीच्या ठायीं । सामावला कधींच नाहीं । दोघे पृथक राहिले ॥ १४११ ॥ तेव्हां जीव तोही चिद्रूप । आणि ईश तोही चिद्रूप । म्हणून ऐक्याचें माप । नये दोघां लावितां ॥ १४१२ ॥ कां कीं समानत्व जे ठायीं ।

ते सारखेच दोघेही । तेथें कोणाची कोणा नाहीं । एक होण्याची आवश्यकता ॥ १४१३ ॥ पहा रामा आणि गोविंदा । यांचें न ऐक्य होई कदा । गोविंदा तो गोविंदा । रामा तो रामा असे ॥ १४१४ ॥ दोघेही आहेत नर । तेंवीं जीव आणि परमेश्वर । निरनिराळे साचार । कां न रहावे विबुध हो ॥ १४१५ ॥ ऐशा एका पक्षाची । मांडणी येथें होईल साची । परी ते कैसी चुकीची । तें विचारें पाहूं आतां ॥ १४१६ ॥ जीव चिद्रूप आहे जरी । तो ईश्वराचा अंश परी । दीपरवींची जोडी खरी । नाहीं यांच्या समान ॥ १४१७ ॥ रामा गोविंदाची स्थिति । यापरीच निश्चिती । ह्या दोन असती व्यक्ती । तेथें अंशाचा संबंध नसे ॥ १४१८ ॥ येथें जीव अंश आहे । त्यासी स्वतंत्रता नोहे । चिद्रूपता जी लाधली पाहे । अंशमात्रें तयाला ॥ १४१९ ॥ तो निजरूप विसरला । उपाधीमाजीं सांपडला । म्हणून भासूं लागला । भिन्न ईशापासून ॥ १४२० ॥ या जीवाचें अभिन्नपण । ईशासी येणें रिती जाण । सूर्य आणि सूर्यकिरण । पहा म्हणजे कळेल तें ॥ १४२१ ॥ सूर्य आणि सूर्यकिरण । हे मूळचेच अभिन्न । किरणालागीं सूर्यपण । नाहीं कधीं प्राप्त झालें ॥ १४२२ ॥ सूर्य आहे सूर्याठायीं । किरणें आहेत व्यापक पाहीं । परी किरणाला गती नाहीं । सूर्याविण कोठेंच ॥ १४२३ ॥ पहा पाहून किरणाला । म्हणती सूर्य उगवला । येथें उगवल्याचा बोध झाला । सूर्यकिरणद्वारानें ॥ १४२४ ॥ म्हणजे सूर्याचें जें व्यापकपण । तेंच त्याचें होय किरण । प्रकाश आणि नारायण । हा नुसता शब्दवाद ॥ १४२५ ॥ प्रकाश सूर्यापासून सुटला । जग-उपाधींत सांपडला । म्हणून आलें आहे त्याला । प्रकाश नांव विबुध हो ॥ १४२६ ॥ हा होण्यालागीं प्रकाश । उपाधी आहे आकाश । तेजा प्रसरण पावण्यास । वाव त्यानें मिळाला ॥ १४२७ ॥ आकाश जरी नसतें । तरी रवीतेज रवींत राहतें । प्रकाशनांवा न पावतें । निःसंशय विबुध हो ॥ १४२८ ॥ आतां आकाश हीं ईशशक्ती । तेजही त्याचीच शक्ती । शक्ती म्हणजे प्रकृती । साच आहे विबुध हो ॥ १४२९ ॥ प्रकृतीचा थयथयाट ।

तेंच हें विश्व अफाट । पंचभूतांसी नाहीं वाट । इच्यापुढें जाण्याची ॥ १४३० ॥ अमृतानुभव ग्रंथांतरीं । बोलली ज्ञानेश-वैखरी । 'जो प्रियूचि प्राणेश्वरी' । तें करा अवलोकन ॥१४३१॥ श्रुतीही ऐसेंच सांगत । कंठरवें करून सत्य । तें आणा ध्यानांत । 'जीवो ब्रम्हैव नापरः' ॥ १४३२ ॥ 'ममैवांशो जीवलोके' । ऐसें आहे वचन निकें । गीताशास्त्रामाजीं देखें । म्हणजे संशय फिटेल ॥१४३३॥ एवं च हा जीव साचा । अंश सच्चिदानंदाचा। येथें अन्य कल्पनेचा । मुळीं टिकाव न लागेल ॥ १४३४ ॥ तो निजरूप विसरला । म्हणून जीवपणास आला । तो त्याचें स्वरूप त्याला । कळण्या पराभक्ती साधन ॥ १४३५ ॥ म्हणजे उपाधीनाश जोंवर । झाला नाहीं तोंवर । हा भिन्नतेचा प्रकार। दृष्टीस पडे ॥ १४३६ ॥ आतां या उपाधीचा । धर्म कोण्या-प्रकारचा । तो आहे कळावयाचा । पुढील सूत्रांवरून ॥१४३७ ॥

## न विकारिणस्तु करणविकारात् ॥ ९५ ॥

जीव मुळींच अविकारी । हे विकारधर्म सर्वतोपरी । उपा-धीच्या माझारीं । झाले असती समाविष्ट ॥ १४३८ ॥ म्हणजे विकार अवघे उपाधीचे । ते मुळींच नाहींत जीवाचे । हे जीवा-ठायीं असल्याचें । ज्ञान होतें अज्ञानें ॥ १४३९ ॥ मी सुखी दुःखी हा विकार । जो उठला साचार । त्याचा संबंध तिळभर । नाहीं पहा जीवासी १४४० ॥ हे जीवाचे विकार असते । तरी सुषुप्तीकालीं प्रत्यया येते । ज्याअर्थीं तसें न होतें । म्हणून ते न त्याचे हो ॥ १४४१ ॥ सुषुप्तीकालीं साचार । बुद्ध्यादिकांचे व्यापार । न होती थोडेफार । ते असती निश्चेष्ट ॥ १४४२ ॥ मी सुखी दुःखी हें जें म्हणे । तें उपाधीच्या गुणें । उपाधीरूप पिशा-च्चानें । वेधिल्या ऐसेंच होय कीं ॥ १४४३ ॥ पहा एक ब्राह्मण । त्यास लागली कैकाडीण । ती अंगांत येऊन । खाया मागे मांस पहा ॥ १४४४ ॥ त्या वेळीं ब्राह्मणपण । त्याचें जाय झांकून । तेंवी उपाधिठायीं आपुलेपण । जीव हा विसरतो ॥ १४४५ ॥

जें उपाधीची भेट होती। तें तिचेच गुण अंगीं येती। पहा तापलेल्या पाण्याप्रती। म्हणजे अवघें कळेल ॥१४४६॥ हिरवा तांबडा आणि पीत। हे मिसळतां पाण्यांत। रंगाप्रमाणें दिसूं लागत। पाणी पहा त्या कारणें ॥ १४४७ ॥ वा रंगीबेरंगी कांचेंतून। पाडिल्यास सूर्याकिरण। ते त्या रंगासमान। दिसों लागती प्रत्यक्ष ॥ १४४८ ॥ म्हणजे हे रंग उपाधीचे। नाहींत सूर्याकिरणांचे। अथवा उष्णपण पाण्याचें। उष्णतेचें निःशंक ॥ १४४९ ॥ अग्नी उपाधी जेव्हां आला। तेव्हांच तप्तता जलाला। तोच न्याय लागू झाला। या जीवाकारणें ॥ १४५० ॥ म्हणून हें जन्ममरण। वा सुखदुःख जाण। हे उपाधीचे असती गुण। त्याहून जीव वेगळा ॥ १४५१ ॥ 'जीवापेतं' मंत्रांत। श्रुती हेंच सांगत। भगवद्गीता हेंच म्हणत। 'न जायते म्रियते' ॥ १४५२ ॥ निरसन त्या उपाधीचें। साधन पराभक्तीचें। व्हाया ज्ञाते बोलले वाचें। नानाविध शास्त्रांतून ॥ १४५३ ॥ या पराभक्तीच्या द्वारें। निजरूप जीवा साजिरें। कळणार आहे बुध हो खरें। आणि हें होणें तोच मोक्ष ॥ १४५४ ॥

## अनन्यभक्त्या तद्बुद्धिर्बुद्धिलयादत्यंतम् ॥ ९६ ॥

आतां उपाधीसी उपाधित्व। जें कांहीं बुध हो येत। तें या बुद्धीमुळें सत्य। येरव्हीं नाहीं ॥ १४५५ ॥ बुद्धीचे ठिकाणीं। जी जाणीवशक्ती आहे जाणी। तीच शक्ती मांडणी। करिते या उपाधीची ॥१४५६॥ सुखदुःखाचें भान। बुद्धीमुळेंच होतें जाण। बुद्धीवांचून गती आन। नाहीं सुखदुःखाला ॥१४५७॥ सामान्य सुखदुःखारहित। जें आहे ईशतत्त्व। त्या निर्भेळ स्वरूपांत। लय झाल्यास बुद्धीचा ॥ १४५८ ॥ मग दुःख तेंही संपलें। आणि सुख तेंही ना उरलें। ऐशा स्थितींत जे का रंगले। तेच गेले मोक्षासी ॥ १४५९ ॥ पहा शस्त्रक्रिया करण्याप्रती। एक औषध हुंगण्या देती। तें औषध जाणीव शक्ती। करी नाहींशी देहांतून ॥ १४६० ॥ जाणीव बंद झाल्यावरती। यातनाही ना

होती। म्हणजे शस्त्रक्रियेनें देहाप्रती। दुःख होतें हें चुकीचें ॥ १४६१ ॥ तेंवी श्रोते सुख तेंही । जाणिवेमुळें पाही । सुख-दुःखास कारण होई । जाणीवशक्ती बुद्धीची ॥ १४६२ ॥ हा बुद्धिरूप उपाधी सत्य। पराभक्तीनें लय पावत। म्हणून परा-भक्तीचें महत्त्व। विशेष हें विसरूं नका ॥ १४६३ ॥ ' यो बुद्धेः परतस्तु सः ' । हा गीतेचा उपदेश ऐसा । त्यावर ठेवा भरंवसा। म्हणजे कार्य होईल ॥ १४६४ ॥ पराभक्तींत ऐसी सोय । या बुद्धीचा होतो लय। तो झाल्या गवसे ठाय । सच्चिदानंद हरीचा ॥ १४६५ ॥ बुद्धीच्चिया बरोबरी। उपाधीही संपे खरी। ऐसा पराभक्ती माझारी । आहे गुण विशेष ॥ १४६६ ॥ म्हणून मोक्षाचें साधन। पराभक्ती हीच जाण। ती नरजन्मास येऊन। अवश्य केली पाहिजे ॥ १४६७ ॥ आतां कर्मरूप हा संहार । मागें लागला साचार। त्याचा व्हाया परिहार । पराभक्ती साधन कसें ॥ १४६८ ॥ खुलासा या शंकेचा । पुढील सूत्रीं आहे साचा । उपकार महत शांडिल्याचा। झाला नसे मोल त्यासी ॥ १४६९ ॥

## आयुश्चिरमितरेषां तु हानिरनास्पदत्वात् ॥ ९७ ॥

या संसारासी कर्म कारण। कर्मामाजी प्रकार तीन। संचित प्रारब्ध क्रियमाण। ऐसे मुद्दे ध्यानीं धरा ॥ १४७० ॥ संचिताच्या अंशानें। प्रारब्धास उदया येणें। आहे हें जाणती शहाणे। येथें दुमत न कोणाचें ॥१४७१॥जीं कर्में फलोन्मुख। म्हणजे भोगण्या योग्य झालीं देख। त्यालाच हें नांव एक। प्रारब्ध आहे विबुध हो ॥१४७२॥ तें प्रारब्ध आमरण। भोगणें आहे जाण। देहपाता-वांचून। नाश नोहे तयाचा ॥१४७३॥ आतां हें संचित। मुळीं पूर्व जन्मार्जित। तें संचिताच्या रूपाप्रत। झालें बुद्ध्यादि उपा-धीनें ॥१४७४॥ त्या बुद्ध्यादि उपाधीचा। नाश ज्ञानें होय साचा। यास आधार गीतेचा। येणेपरी असे हो ॥ १४७५ ॥ गीतेच्या चवथ्या अध्यायांत। सदतिसाव्या श्लोकांत। स्पष्टपणें भगवंत। बोलला असे तें ऐका ॥ १४७६ ॥ ' ज्ञानाग्निः सर्वकर्माणि '।

ऐसी आहे ईशवाणी । ज्ञानाग्नीच्या योगानीं । सर्व कर्मे भस्म होती ॥१४७७॥ म्हणजे ज्ञान संचिता लागून । करून टाकितें दहन । आणि प्रारब्ध तें भोगून । संपविणें आहेच कीं ॥१४७८॥ आतां तिसरें क्रियमाण । त्याचें होतें नाशन । सर्व कर्मे ईशार्पण । शुद्धभावें अर्पिल्या ॥ १४७९ ॥ हें ईशार्पण झालेलें । कर्म जें आहे भलें । त्या माजीं मुळी न उरलें । कर्मत्व तें एतुलेंही ॥१४८०॥ जेंवी भाजलेल्या बीजाठायीं । बीजपणा उरला नाहीं । तीच गती आहे पाहीं । या ईशार्पण कर्माची ॥ १४८१ ॥ एवंच साधल्यावर । कांहीं न शिल्लक राहणार । संचित क्रियामाणाचे प्रकार । ऐसी श्रेष्ठ पराभक्ती ॥ १४८२ ॥ धर्म राजाचें संचित । ज्ञानें झालें भस्मीभूत । भोगोनियां सारिलें सत्य । त्यानें आपुल्या प्रारब्धाला ॥ १४८३ ॥ धर्माचें प्रारब्ध खडतर । एका बाजूनें साचार । होतें परी त्याचा जोर । ईशकृपेनें कमी झाला ॥१४८४॥ त्याचा तो वनवास भला । ईश्वरा न टाळितां आला । मात्र तो सुगम केला । आपुला भक्त म्हणून ॥ १४८५ ॥ तो वनवास भगवंता । आला असतां टाळितां । परी प्रारब्ध भोगाची अपूर्णता । राहिली असती धर्माच्या ॥ १४८६ ॥ ती अपूर्णता न ठेवली । भोगून कर्मे सारिलीं । पुढें न कांहीं होऊं दिलीं । त्याच्या अनन्यभक्तीनें ॥ १४८७ ॥ हरिश्चंद्र राजाचा । ऐसाच इतिहास आहे साचा । वनवास रामचंद्राचा । सारिला रामें भोगून ॥१४८८॥एवंच पराभक्तीचें सेवन । श्रेष्ठ आहे सर्वांहून । न सांगतां रक्षण भगवान । अक्षय त्याचें करी ॥ १४८९ ॥ आणि देहपाता-नंतर । मोक्षही देत साचार । म्हणून पराभक्तीचें हें द्वार । पाहणें येऊन नरजन्मीं ॥ १४९० ॥ देहपात होईपर्यंत । परा-भक्ती सेवितां सत्य । राहतो जीवन्मुक्त स्थितींत । पुढें मिळे कैवल्य ॥ १४९१ ॥ व्हावया पापमुक्ती । समर्थ एक पराभक्ती । आतां संसाराची निवृत्ती । होय कशानें तें पाहूं ॥ १४९२ ॥

**संसृतिरेषामभक्तिस्यान्नाज्ञानात्कारणासिद्धेः ॥ ९८ ॥**

व्हाया संसारप्रवृत्ती । कारण आहे अभक्ती । अभक्ती म्हणजे विस्मृती । ईशाविषयीं पडणें ती ॥ १४९३ ॥ कोणी अज्ञानजन्य

म्हणती । श्रोते या संसाराप्रती । परी या म्हणण्याची संगती । लागत नसे अणुमात्र ॥ १४९४ ॥ अज्ञानमात्रें करून । संसाराचें न होय जनन । संसाराचें असणेंपण । आहे एका अभक्तीमुळें ॥ १४९५ ॥ भक्तीचा अर्थ ऐका आतां । भक्ती म्हणजे ईश्वर प्रवणता । जोंवरी ती न आली हाता । तोंवरी कांहीं न साधत ॥ १४९६ ॥ मोहजन्य द्वंद्वें अनेक । संसारीं असती देख । हा मुळीं सुखदुःखात्मक । आहे आहे विबुधहो ॥१४९७॥ त्या सुखदुःखाची । इच्छा आणि द्वेषाची । होळी आहे व्हावयाची । ईशा अनन्य झाल्यावर ॥ १४९८ ॥ ईशा ठायीं अनन्य होतां । सुखदुःखाची नुरे वार्ता । सुखदुःख हें संपतां । संसार तोही संपतसे ॥१४९९॥ पहा श्रीमद्भागवतांत । श्रोते एकादश स्कंदांत । चौदाविया अध्यायांत । उद्धवा हरी हेंच सांगे ॥ १५०० ॥ केवळ एका भक्तीनें । माझी प्राप्ती आहे होणें । तेथें इतर साधनें । गौण आहेत सहजची ॥ १५०१ ॥ तेंवी कठोपनिषदांत । 'नायमात्मा' या ऋचेंत । हाच आहे सिद्धांत । परमात्मा साध्य भक्तीनें ॥ १५०२ ॥ ही परा भक्ती म्हणोनी । सेव्य सर्व बाजूंनीं । हीच मोक्षदायिनी ॥ म्हणून सेवा तियेला ॥ १५०३ ॥ आतां श्रोते येथवरी । भक्ती मुक्ती कथिली खरी । सृष्टी आणि तत्वें सारीं । कथन केलीं आहेत ॥ १५०४ ॥ तीं सार किंवा असार । याचा व्हावया निर्धार । प्रमाणाचे प्रकार । पुढील सूत्रीं कथन केले ॥ १५०५ ॥

त्रीण्येषां नेत्राणि शब्दलिंगाक्षिभेदाद्रुद्रवत् ॥ ९९

वरील सर्व गोष्टींचें । ज्ञान व्हावया साचें । साधन तीन प्रकारचें । आहे तें अवधारा ॥ १५०६ ॥ पहिलें प्रत्यक्ष प्रमाण । दुसरें तें अनुमान । शब्द प्रमाणा तिसरें स्थान । देणें क्रमशा प्राप्त असे ॥ १५०७ ॥ प्रत्यक्ष प्रमाण नांव त्याचें । वस्तू व अंतःकारण वृत्तीचें । एकीकरण होऊन साचें । जें येतें प्रत्यया ॥१५०८॥म्हणजे कांहीं वस्तू पाहिली । ती अंतःकरणीं ठसावली ।

आणि त्या ठसण्यानें उठिली । वृत्ती प्रत्यक्ष प्रमाण तें ॥१५०९॥ दगड दृष्टीनें पाहिला । तो अंतकरणें कबूल केला । बुधहो ऐशा स्थितीला । प्रत्यक्ष प्रमाण म्हणतात ॥ १५१० ॥ म्हणजे ज्ञेय आणि ज्ञातृ चैतन्य । जव्हां जाय एकवटून । तेव्हांच होतें जनन। या प्रत्यक्ष प्रमाणा ॥ १५११ ॥ अनुमान प्रमाणाची स्थिती । आहे बुधहो येणें रीति । प्रत्यक्षाचा अभाव निश्चितीं । असून अनुमानें ज्ञान होतें ॥ १५१२ ॥ पांच प्रकारें अनुमानाची । सिद्धी आहे होणें साची । ऐका नांवें तयांची । देतों मात्र ये ठाया ॥ १५१३ ॥ प्रतिज्ञा हेतु उदाहरण । उपनय आणि निगमन । यांच्या साह्यें करून । अनुमान हें सिद्ध होतें ॥ १५१४ ॥ यांचा करितां विस्तार । ग्रंथ उगाच वाढेल फार । बोध होण्यास साचार । नांवें मात्र कथन केलीं ॥ १५१५ ॥ मूल घरीं नाहीं दिसलें । म्हणून कां तें आहे मेलें । तें कोठें तरी आहे गेलें । खेळावया बाहेर ॥ १५१६ ॥ हें अनुमानें कळून येत । जें प्रत्यक्ष नाहीं दिसत । अशा वस्तूची सिद्धी होत । अनुमानाच्या योगानें ॥ १५१७ ॥ ज्याचा निश्चय शब्दें करून । होत तें शाब्द प्रमाण । शब्दप्रमाणीं जाण । महत्त्व आप्तवाक्याला ॥ १५१८ ॥ म्हणजे संबंध ज्याचा । वस्तूशीं निकट असेल साचा । तयाच्या त्या शब्दाचा । समावेश आप्तवाक्यामधें ॥ १५१९ ॥ गुराखी म्हणे धन्यासी । तुमची गाय काननासी । व्याली गोऱ्हा तियेसी । झाला आहे उत्तम ॥ १५२० ॥ येथें गाय व्यालयाचा । निश्चय शब्देंच झाला साचा । निश्चय ईश्वरी तत्त्वाचा । प्रथमता होतो शब्देंच ॥ १५२१ ॥ या शाब्द प्रमाणांत । इतुक्यांचा समावेश होत । तें आणा ध्यानांत । म्हणजे अवघे कळेल ॥ १५२२ ॥ श्रुति स्मृति पुराण । शिक्षा निरुक्त व्याकरण । सत्पुरुषांचें भाषण । हें शब्दप्रमाण समजावें ॥१५२३॥ श्री रुद्र देवाकारण । जेसे डोळे आहेत तीन । तैसींच हीं प्रमाणें जाण । ईश्वरी तत्त्व जाणावया ॥१५२४ ॥ रुद्र देव तीन नेत्रांनीं । पाहे विश्वालागोनी । तेंवी तिन्ही साधनांनीं । ईशतत्त्वा पहावें ॥ १५२५ ॥ श्रोते येथवरी भला । ईशतत्वाचा विचार झाला । आतां सृष्टीचा राहिला । तो पुढील सूत्रीं असे ॥ १५२६ ॥

आविस्तिरोभावा विकाराः स्युः क्रियाफलसंयोगात् ॥१००॥

या सृष्टीचें प्रकटीकरण । आणि तिचें तिरोधान । हे असती विकार पूर्ण । या सृष्टीच्या अंगींचे ॥१५२७॥ या दोन्ही स्थितींचें ज्ञान । होत आहे सृष्टीवरून । सूक्ष्मपणें अवलोकन । विचारें करितां कळे तें ॥ १५२८ ॥ आतां श्रोते पहा निरुक्तास । तेथें सहा विकार वस्तूस । होती ऐसा खास । सिद्धांत तो केला असे ॥१५२९॥ उत्पन्न होणें आणि असणें । परिणत होणें वाढणें । क्षीण होणें नष्ट होणें । ऐसे हे सहा ॥ १५३० ॥ हे सहा विकार जरी । कथिले निरुक्ताभीतरीं । त्यांचा समावेश होतो परी । उत्पत्ति आणि नाशांत ॥ १५३१ ॥ सर्व वस्तु सृष्टीच्या । नाहीं शाश्वत स्वरूपाच्या । त्या कारणीं एकमेकांच्या । उपजती आणि जाती ॥ १५३२ ॥ पहा मातीपासून घट झाला । तो घटाच्या रूपा आला । आणि तेथेंच लीन झाला । मृत्तिकेच्या रूपांत ॥१५३३॥ विशिष्ट वायूचें एकीकरण । होतां उदकाचें होय जनन। तेंच अग्निसंबंधें करून । वाफ होऊन लया जाई ॥ १५३४ ॥ या उदाहरणावरून । आलें आहे तुम्हां कळून । या सृष्टीचें अशाश्वतपण । ईश एक अविनाश ॥१५३५॥ ही अशाश्वत सृष्टी व्हावया । मूळ कारण आहे माया । तीही नाशापासून या । सुटली नाहीं विबुध हो ॥ १५३६ ॥ लय दोन प्रकारचा । एक सृष्टिप्रलयकालचा । यांत जीवासह अवघ्याचा । लय होतो पहा तरी ॥ १५३७ ॥ जीव आणि जीवोपाधी । तैसेच राहती त्यामधीं । त्याला न मिळे अवधी । त्यांत लय होण्यास ॥ १५३८ ॥ जीवोपाधीचा लय । परा भक्तीनेंच होय । ऐसें श्रेष्ठत्व अतिशय । या पराभक्तीचें ॥ १५३९ ॥ या परा भक्तीकरून । जीवोपाधी लय होऊन । जीव मिळतसे जाऊन । अखेर ईशस्वरूपीं ॥ १५४० ॥ जन्ममरणाची बाधा । मग त्यासी न होय कदा । म्हणोन परा भक्ती साधा । अविनाश मोक्षाकारणें ॥१५४१॥ एवं च सर्वाधार सर्वेश्वर । उपाधी न ज्या साचार । जो सच्चिदानंद अव्यय अमर । सर्व सत्ताधीश जो ॥ १५४२ ॥ ऐशा त्या ईशाप्रत । जो

अनन्य भावें शरण जात । तोच या परा भक्तीप्रत । जाऊनियां पोंचतसे ॥ १५४३ ॥ ती परब्रह्मात्मैक्य परा भक्ती । जे जे कोणी सेविती । ते तें तरुनि इतरांप्रती।समर्थ होती तारावया ॥१५४४॥ ऐसी पराभक्ती सेवितां । संत होतो सर्वथा । त्या महात्म्याची योग्यता । काय मुखें वर्णावी ॥ १५४५ ॥ श्रोते हें संतत्व । विद्वत्तेनें न लाभत । तें न वक्तृत्वें प्राप्त होत । त्याचा धर्म निराळा ॥ १५४६ ॥ स्वानुभवाचें ब्रह्मज्ञान । व्हाया सशास्त्र पाहिजे आचरण । झालें पाहिजे मन । विषयापून परावृत्त ॥ १५४७ ॥ ज्ञानकर्मेंद्रियें ज्याचीं । सेवा करिती ईशाची । त्यावीण ती कोणची । वस्तु न ज्याच्या दृष्टीपुढें ॥ १५४८ ॥ वाणी ज्याची अलंकृत । श्रीहरीच्या नामें सत्य । जो जगाठायीं अवलोकित । सच्चिदानंद प्रभूतें ॥१५४९॥ ईशाचेच ऐके गुण । ईशाचेंच चिंतन । निष्पाप ज्याचें झालें मन । श्री गोदेच्या जलापरी ॥ १५५० ॥ या परीची स्थिती होतां । संतत्व येतसे हाता । मग किमपि नुरे भिन्नता । ईशांत आणि त्याच्यांत ॥ १५५१ ॥ तो जीवन्मुक्त साचार । चालता बोलता परमेश्वर । म्हणून करा यत्न थोर । परा भक्ती साधण्याचा ॥१५५२ ॥ परा भक्तीचीं साधनें । करा परा भक्तीकारणें । तेथें झाल्या अधिक उणें । परा भक्ती स्वप्नीं नये ॥ १५५३ ॥ उपनिषदाचें अध्ययन । करा अपरोक्ष व्हाया ज्ञान । उगीच खंडणमंडण । करण्यासाठीं शिकूं नका ॥ १५५४ ॥ केवळ प्रवचनार्थ बरवी । ज्ञानेश्वरी न अभ्यासावी । ती सोंवळीच ठेवावी । आचरणांत आणावया ॥१५५५॥ हरीसाठीं हरीस्मरण । नको फड स्थापाया कारण । फडांनीं होय हिडहिड जाण । त्या शुद्ध भजनाची ॥ १५५६ ॥ पंढरीची वारी । करणें हरीसाठीं खरी । उगीच शिष्य गांवभरी । करणें असल्या खोटी ती ॥ १५५७ ॥ एवं च कोणत्याही साधना । येऊं न द्या दांभिकपणा । नटून बसती वारांगना । हें ध्यानांत असूं द्या ॥ १५५८ ॥ ऐसीं साधनें पाळाल । तरी परा भक्ती साधाल । आणि अजरामर होऊन जाल । या इहपर लोकांमधें ॥ १५५९ ॥ आतां आरंभींच्या सूत्रांत । आहे चारी वर्णाप्रत । या

परा भक्तीचा अधिकार सत्य । सांगते झाले शांडिल्य ॥१५६० ॥ पुढें पराभक्तीचें । रूप तें कथिलें साचें । आणि तें साध्य होण्याचे । उपाय क्रमें कथन केलें ॥ १५६१ ॥ साधनाचे प्रकार । त्या त्या सूत्रीं सविस्तर । कथन केले येथें फार । त्यांविषयीं वदणें नको ॥ १५६२ ॥ तेंवी गौणी भक्ती सांगितली । तिचीं फलेंही कथन केलीं । कोठें शंका न ठेविली । साधकातें यत्किंचित ॥ १५६३ ॥ साध्य साधनावांचून । केव्हांहीं न साधे जाण । साधनीं कांहीं होतां गौण । तें फलोन्मुख होईना ॥ १५६४ ॥ अलीकडच्या काळीं । साधनांची झाली टवाळी । म्हणून फलें पळालीं । दूर दूर श्रोतेजन ॥ १५६५ ॥ उत्तम जें मोक्षसाधन । तें सांप्रत ठरलें हीन । अधिभौतिक शोधालागून । महत्त्व आलें ये वेळीं ॥ १५६६॥ ते शोध नवीन ज्यांनीं । लाविले त्यांचा झाला जनीं । गौरव सर्व बाजूंनीं । मोक्षा न कोणी पुसतसे ॥१५६७॥ परी विचारें पाहूं जातां । अधिभौतिकाहून अध्यात्मसत्ता । मोठी आहे सर्वथा । शंका येथें न धरा हो ॥१५६८॥ अध्यात्मसत्ता भूप जाण । आणि भौतिक त्याचा प्रधान । प्रधान हा राजाहून । श्रेष्ठ होणें नाहीं कधीं ॥ १५६९ ॥ शोध लावण्या अधिभौतिक । स्थिती पाहिजे संपन्न देख । तसें बुद्धिचातुर्य अलौकिक । शोधकाठाईं पाहिजे ॥ १५७० ॥ आधिभौतिक शास्त्रांचा । शोध मानवां लागे साचा । विचार पंचभूतांचा । त्यांच्या शक्तीसह केल्यास ॥ १५७१ ॥ अध्यात्मीं तसें नाहीं । याचा धर्म वेगळा पाहीं । येथें कशाची गरज नाहीं । तें विचारेंच प्राप्त होतें ॥ १५७२ ॥ भरतखंडामाजीं भलें । ज्ञात्यांनीही ठरविलें । अध्यात्मशास्त्र आगळें । आहे । सर्व शास्त्रांहून कीं ॥ १५७३ ॥ ऐहिक आणि पारमार्थिक । मानवासी लागे सुख । हें एकची सेवल्या देख । अध्यात्मशास्त्र विबुध हो ॥ १५७४ ॥ खगोल भूगोल रसायन । याचें करून शोधन । प्रयोगातें दावून । थक्क जगाला केलें जरी ॥ १५७५ ॥ परी या शोधकर्त्यांनीं । आपण आलों कोठूनी । झालों कशापासूनी । हें न कांहीं जाणीतलें ॥ १५७६ ॥ ते केवळ वाढपे झाले । आपण उपाशीच राहिले ।

जन्मूनियां वायां गेले। एक अध्यात्मावांचून ॥ १५७७ ॥ अध्यात्माच्या बळावर। गोरखानें डोंगर। करून दावला भांगार। ज्ञानेशें भित चालविली ॥ १५७८ ॥ एकट्या कानीफ नाथांनीं। अध्यात्माच्या बळांनीं। श्वास टाकिले रोखोनी। गोपिचंदाच्या सैन्याचे ॥१५७९॥ तोफा बंदुका तलवारी। सैनिकां जवळ होत्या जरी। उपयोगी न आल्या परी।श्वासोश्वास रोखितां ॥ १५८० ॥ हे अध्यात्माचे चमत्कार। हल्लीं फोल वाटती साचार। विश्वास न बसे साचार। बहुतेकांचा याचेवरी ॥ १५८१ ॥ ऐसी यावया आपत्ती। हेंच कारण निश्चिती। दुरावली हरिभक्ती। खरीखुरी राष्ट्रांतून ॥ १५८२ ॥ अध्यात्मवेत्त्या पुरुषांचें। वर्णन इतिहासांत साचें। तेंही कविकल्पनेचें। आहे म्हणती कोणी कोणी ॥१५८३॥ त्यांच्याकडेही दोष नाहीं। ते वस्तुस्थिति पाहती पाहीं। अध्यात्मवेत्ता उरला नाहीं। हाय हाय गे दुर्दैवा ॥ १५८४ ॥ एक भगवान् साह्य होतां। अवघीं सुखें येतील हातां। हाच उपाय उरला आतां। राष्ट्र संपन्न करण्याचा ॥ १५८५ ॥ बुद्धिमान पुरुष आपणांत। अद्यापही उपजतात। परी त्यांनाही पडत। मोह आधिभौतिकाचा ॥ १५८६ ॥ नाहीं साहित्य नाहीं धन। अवघ्यांस आलें दास्यपण। अशा स्थितींत संपन्न। व्हायाची आशा नको ।। १५८७ ।। सत्ता धन साहित्य। पाहिजे आधिभौतिकाप्रत। याची गरज नाहीं अध्यात्मांत। म्हणोनियां तेंच करा ॥ १५८८ ॥ श्रद्धा पाहिजे शास्त्रावरी। सदाचाराची महाथोरी। विश्वास पाहिजे अंतरीं। ईशाविषयीं अलोट ।। १५८९ ॥ तरिच अध्यात्म साधेल। इहपर सौख्य लाधेल। म्हणूं नका करूं वेळ। साधून घ्यावी पराभक्ति ॥ १५९० ॥ अध्यात्म म्हणजे तत्त्वज्ञान। जें अज्ञानाचें निरसन। करुनी करी सुखसंपन्न। सर्व बाजूंनीं साधका ॥ १५९१ ॥ तत्त्वज्ञानाची महाथोरी। ते अशुभ अवघें दूरी करी। तत्त्ववेत्ता भूमिवरी। प्रती ईश्वर होतसे ॥ १५९२ ॥ मात्र तें तत्त्वज्ञान। झालें पाहिजे ग्रहण। सशास्त्र सविधी करून। हें मात्र विसरूं नका ॥ १५९३ ॥ खानदेशांत अंमळनेर। नामें आहे एक शहर। तेथें तत्त्वज्ञानमंदिर।

प्रतापशेठांनीं बांधिलें ॥ १५९४ ॥ या प्रतापशेठांची । भक्ति तत्त्वज्ञानावरी साची । किंमत मानससरोवराची । होत राजहंसाला ॥ १५९५ ॥ त्यानें मंदीर उभारिलें । बहुत पैसे खर्च केले । ते वांया जाऊं न द्यावे भले । श्रम प्रतापशेठांचे ॥१५९६॥ सविधी तत्त्वज्ञान सेवा । अधिकार त्याचा जगास दावा । आर्यमहीचा फेडावा । पांग तुम्हीं या वेळीं ॥ १५९७ ॥ एका तत्त्वज्ञानावीण । अवघीं कृत्यें आहेत क्षीण । त्या अमोघ ज्ञानालागून । जोड द्या पराभक्तीची ॥ १५९८ ॥ तरीच तें रूपा येईल। इच्छित कार्य करील । हें नरजन्मींच साधेल । म्हणून सेवा पराभक्ती ॥ १५९९ ॥ एक पराभक्ति सेवितां । ज्ञान तेंही येईल हातां । जेवी सूर्याची प्राप्ति होतां । प्रकाश लाभे त्याच्या सवें ॥ १६०० ॥ म्हणून भक्तिसहित ज्ञान । करा बुध हो आदरें ग्रहण । उगीच तत्त्वज्ञानाचें व्याख्यान । देण्यांत मजा नाहीं ॥ १६०१ ॥ अध्यात्मवेत्ते एक संत । त्यांचा अंकित भगवंत । तें संतत्व प्राप्त होत । या एका पराभक्तीनें ॥ १६०२ ॥ म्हणून वेळ दवडूं नका । सोंगें संतांचीं आणूं नका । संतत्व सोवळें राखा । पूर्वीपरीच सांप्रत ॥ १६०३ ॥ मठमठीका बांधल्यानें । संतत्व नाहीं अंगीं येणें । वा खेपा घातल्यानें । पंढरीच्या निरर्थक ॥ १६०४ ॥ म्हणून उपाधी वाढवूं नका । वैराग्यास लागेल धक्का । सदाचारास बुक्का । फांसूं नका विबुध हो ॥ १६०५ ॥ सश्रद्ध करावी वारी । चित्तीं सांठवावा हरी । पंथ बहुत असले जरी । तरी सर्वांचें ध्येय एक ॥ १६०६ ॥ नामभेदें ईशाप्रत । येणें नाहीं भिन्नत्व । अवघ्यांचा एकची सत्य । अंतर्बाह्य तोच तो ॥ १६०७ ॥ भिन्न भिन्न पंथांच्या । मांडण्या निराळ्या साच्या । परी त्या एकाच गांवाच्या । वाटा हें विसरूं नका ॥ १६०८ ॥ आतां हीच विनंती । अवघ्या भाविक श्रोत्यांप्रती । शांडिल्यसूत्रांचा विचार चित्तीं । अहोरात्र करा हो ॥ १६०९ ॥ शांडिल्य गर्ग बादरायण । चवथा ब्रह्मदेवनंदन । अवघ्यांनीं केलीं कथन । मोक्ष दर्शी भक्तिसूत्रें ॥ १६१० ॥ मांडणीमाजीं फरक । थोडाथोडा आहे देख । परी अवघ्यांचें ध्येय एक । त्यांत मात्र फरक नसे ॥ १६११ ॥ हीं शांडिल्यसूत्रें भलीं । अरणामाजीं कळसा गेलीं । श्रीअश्वत्थाच्या तळीं । संत सावत्यासमोर ॥ १६१२ ॥

शके अठराशें साठांत । बहुधान्य संवत्सरांत । माघ वद्यपक्षांत । श्रीदासनवमी रविवारीं ॥ १६१३ ॥ शांडिल्यसूत्रें पूर्ण झालीं । द्वितीय प्रहरास भलीं । तीं दासगणूनें वाढिलीं । महाराष्ट्रभाषा पात्रींत ॥ १६१४ ॥ ही शांडिल्यसूत्रबोधिनी । रचिता माझा चक्रपाणी । जो जघनीं हात ठवूनी । उभा क्षेत्र पंढरींत ॥१६१५॥ लिहिता लिहविता पांडुरंग । बुद्धिदाता तोच चांग । जो निर्विकल्प अक्षय अभंग । सर्वांठायीं वास ज्याचा ॥ १६१६ ॥ अमृत बुचके लेखक झाला । या सूत्राकारणें भला । दोष टाकून गुणाला । सेवन करा श्रोते हो ॥ १६१७ ॥ हीच विनंती सकळांस । करीतसे गणुदास । शांडिल्यसूत्रीं विश्वास । पूर्ण ठेवा ढळूं न द्या ॥ १६१८ ॥ म्हणजे अवघें कल्याण । होईल सर्व जाईल दैन्य । अखेर कैवल्यदर्शन । स्वानुभवें भोगाल ॥ १६१९ ॥ शांडिल्यसूत्र निरूपण । हेंच गोदावरी जीवन । त्या सच्चिदानंदगोदे लागून । अर्पण करी दासगणू ॥ १६२० ॥ श्रीशांडिल्यसूत्रबोधिनी । सोपान भाविकांलागुनी । मोक्षास होवो जाया प्राणी । हेंच इच्छी दासगणू ॥१६२१॥ सावता ज्ञानेश कूर्मदास । समर्थ स्वामी रामदास । तुकाराम पुण्य पुरुष । शास्त्री वामन ॥ १६२२ ॥ या अवघ्या संतांचा । पाईक मी रजःकण साचा । असो आशीर्वाद तयांचा । या सूत्रांकारणें ॥१६२३॥ त्यांच्या आशीर्वादें करून । हीं सूत्रें केलीं लेखन । त्यांत माझें मोठेपण । मुळींच नाहीं जाणते हो ॥ १६२४ ॥ या सूत्रबोधिनीप्रकाशें । अज्ञानांधकार नासे । अखेर मिळे कैवल्य खासें । अक्षयींचें भोगावया ॥ १६२५ ॥ अतां फार बोलूं किती । पहा याची प्रचिती । घेऊं नका कुतर्क चित्तीं । विनवीतसे दासगणू ॥ १६२६ ॥

जे स्नानपान करिती नित गौतमीचें ।
ज्यांच्या मनीं अतुल प्रेम वसे हरीचें ॥
त्या सज्जनां प्रति समर्पुनि दीपिकेला ।
भावें नमीं, न विसरोत कदा गणूला ॥ १ ॥

दासगणू.

पुंडलीक वरदे हरी विठ्ठल ! ज्ञानेश्वर, नामदेव, सावतेबुवा, श्रीएकनाथ, तुकाराम, रामदास महाराज की जय ! ! !

# शुद्धिपत्र.

| पृष्ठ | ओळ | अशुद्ध | |
|---|---|---|---|
| प्रस्तावना | | | |
| ५ | १७ | तथा | |
| श्रीशाण्डिल्य ऋ. | | | |
| प. महत्वासांत | | | |
| २ | २० | वर्णन | वतन |
| ८ | २० | कस्म | कस्मै |
| भावदीपिका | | | |
| १ | २३ | भगवान | भगवान् |
| ३ | ८ | परवच्चाते | परवच्चाते |
| ४ | २० | ठाया | ठायीं |
| ८ | ८ | नात | नातें |
| १० | ७ | म्हणजं | म्हणजे |
| ११ | २२ | भगवान | भगवान् |
| १२ | २९ | यात्कीचति | यत्किंचित |
| १३ | ११ | आतांत | औतांत |
| १३ | ११ | स्थिता | स्थिती |
| १४ | १९ | साक्षात | साक्षात् |
| १७ | २ | श्रद्धच्या | श्रद्धेच्या |
| २१ | ६ | नामैश्वर्यपरां | तामैश्वर्यपरा |
| २८ | १६ | मामांसीं | मीमांसीं |
| ३१ | १६ | स्रोते | श्रोते |
| ३७ | २३ | पाहिजेल | पाहिजे |
| ६८ | ११ | व | वा |
| ८२ | १८ | जगत | जगत् |
| ९० | १५ | जाहे | आहे |
| ९१ | १० | मात्रु | मात्र |
| ९१ | २२ | पृथक | पृथक् |
| ९७ | २८ | अंत:कारण | अंत:करण |
| १२० | २७ | एवं च | एवंच |